## प्रास्ताविक—

'वाटे चरित्र त्यांचें आपण कांहीं तरावया गावें'

माधवरावजी म्हणजे अव्वल इंग्रजी काळांतलि एक युगप्रवर्तक कार्यकर्ता. अशा युगप्रवर्तक कार्यकर्त्यांचें चरित्र म्हणजे त्या कालाचा इतिहासच. पण आमच्या छोट्या वाचकांस त्या इतिहासाचें आकलन होण्याची ताकद आलेली नसते. म्हणून केवळ विद्यार्थ्यांच्यासाठीं माधवरावजींचा जीवनवृत्तांत लिहिण्याचा प्रयत्न या पुस्तकांत केला आहे. त्या वेळचे निरनिराळे वादप्रसंग आणि समरप्रसंग यांचा ओझरता उल्लेख त्या त्या ठिकाणीं करण्यांत येऊन, केवळ ते प्रसंग कसे घडले यांचीच माहिती येथें देण्यांत आली आहे. त्यामधलि कटुता अगर अशा भांडणामागलि व्यक्तींचा कटुतर अभिनिवेश यांकडे सर्वस्वीं डोळेझांक करण्यांत आली आहे.

हें पुस्तक लिहितांना मला अनेक पुस्तकांचा उपयोग झाला. 'आजकालचा महाराष्ट्र'–( पाध्ये–टिकेकर ), 'आधुनिक भारत' (जावडेकर ), ,टिळक–चरित्र' ( केळकर ) वगैरे अनेक पुस्तकांचा मला उपयोग झालाच, पण श्री. न. र. फाटक यांचें 'रानडे चरित्र' व श्री. रमाबाईसाहेबांच्या 'आठवणी' या पुस्तकांचा तर मला इतका उपयोग झाला कीं, हें पुस्तक माझें आहे, असें म्हणविणें मला कसेंसेंच वाटतें.

'फोडिलें भांडार, धन्याचा माल ।
मी तंव हमाल, भारवाही' ॥

असें म्हणणेंच या बाबतींत युक्त होईल. या सर्वांचा मी ऋणी आहे.

माझ्या मागच्या पुस्तकांप्रमाणें या चरित्राचाहि हा प्रयत्न माझ्या बालवाचकांस आवडेल अशी आशा आहे.

मकरसंक्रमण,
शके १८६३

द. पां. रानडे

# शुद्धिपत्रक

| पान ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- |
| १६, १९ | १८९६ चे सुमारास | १८५६ चे सुमारास |
| २९, ३ | १८५९ चे सुमारास | १८५३ चे सुमारास |
| ५९, १३ | १८७७ चे सुरवातीस | १८७५ चे सुरवातीस |

# न्यायमूर्ति
# - महादेव गोविंद रानडे -

## बैलगाडींतील प्रसंग

इ. स. १८४४ च्या सुमारची गोष्ट. पहाटेच्या शांत वेळीं एक बैलगाडी संथपणें प्रवास करीत होती. पुढें बसलेला गाडीवान पेंगत होता. त्याच्या शेजारीं बसलेला त्याचा साथीदार त्याला साथ करीत होता. केवळ संवयीमुळेंच बैल संथपणें आपला मार्ग आक्रमीत होते. तरी पण रस्ता डोंगराळ असल्यामुळें अधूनमधून



गाडीला हिसके बसत व पुढें बसलेल्या या प्रवाशांचीं डोकीं एक-मेकांवर आदळत; व त्यांना जाग येई. पण पुन्हां संथपणें गाडी चालू झाल्यावर त्यांचा पूर्वीचा घोरण्याचा क्रम लवकरच सुरू होई. मागें गाडींत एक कुटुंब पहाटेच्या साखरझोपेंत दंग होतें.

हळूहळू दिशा फाकूं लागल्या. गाडीच्या मागून एक गृहस्थ घाईघाईनें येत होते. त्यांच्याचपैकीं होते ते. 'घोडाच आहे, जाऊं त्वरेनें व गांठूं गाडीला' अशा विचारानें ते मागच्या मुक्कामावरच रात्रीं रेंगाळले असावे. येतांक्षणींच गाडींत निद्रासुख अनुभवीत असलेल्या मंडळींना त्यांनीं हांका मारण्यास सुरवात केली.

‘ अहो वहिनी, उठा. ’ गाडींतील आपल्या वहिनीस त्यानें हांक दिली, ‘ अहो, उठा आतां, झोप पुरे नाहीं झाली कां ? ’

‘ झाली कीं थोडीशी. ’ वहिनींनीं आंतूनच कसेंबसें उत्तर दिलें. अजून थोडीशी झोप घ्यावी असा त्यांचा विचार असावा. म्हणूनच कांहींतरी कारण हुडकण्याचे निमित्तानें त्या म्हणाल्या, ‘हवेंत किती गारठा आला आहे ! नाहीं भावजी ? ’

‘ म्हणून तर जागें केलें तुम्हाला. मुलांना पांवरूण वगैरे आहे कीं नाहीं तें पहाना ’ त्या गृहस्थानें—विठूकाका त्यांचें नांव—विचारलें.

यानंतर थोडा वेळ वहिनी—गोपिकाबाई—गाडींतच होत्या. पण क्षणार्धांत त्यांनीं गाडीखालीं उडी घेतली. त्यांचा चेहरा काळा-ठिक्कर पडला होता; आणि काळीज धडधडत होतें. या गोंधळांत गाडी थांबून गाडीवान व त्याचा साथीदार दोघेहि स्तिमित होत्साते त्यांचेभोंवतीं आले होते. विठूकाका मात्र घोड्यावरच असून वहिनींचे-कडे मिस्किलपणें हांसत बघत होते. जणू कांहीं भयंकरच थंडी पडली आहे अशा आविर्भावानें त्यांनीं एक भलीमोठी घोंगडी पांघरली होती.

‘ भावोजी, छोटा माधव गाडींत नाहीं ! ’ अखेर त्यांच्या तोंडून येवढे शब्द कसेबसे बाहेर पडले.

तरीपण विठूकाका शांतच होते. ‘ म्हणजे म्हणतां काय वहिनी तुम्ही ! ’ त्यांनीं वहिनींच्यावरच झोड उठविली, ‘ काय झोप आहे कां सोंग आहे ! मुलाचीसुद्धां शुद्ध नसावी ना ! ’

आतां मात्र वहिनींना शोकावेग आवरेना. त्यांच्या डोळ्यांतून गंगायमुना वाहूं लागल्या. ‘ असं हो काय करतां भावजी ’ त्यांनीं अगदीं गयावया करण्यास सुरवात केली. ‘ जरा असेंच मागें जाऊन

पहाना कुठं रस्त्यांत पडलं आहे का माझं बाळ तें–असे उभे कां ? जा ना '—

आतां फार वेळ ताणून उपयोगी नाहीं अशा विचारानें विठू-काकांनीं मोठ्यानें हंसावयास सुरवात केली, व आपल्या अंगा-भोंवतीं गुंडाळलेली घोंगडी सोडून आंतून एका हातांत धरलेलें छोट्या माधवाचें मुटकुळें बाहेर काढून तें त्यांनीं आईच्या स्वाधीन केलें. ' हं–आतां तरी नीट सांभाळा बरं आपल्या बाळाला. नाहींतर आम्हाला हुडकत जावं लागेल मागं मैलन्मैल. ' त्यांनीं आपली टकळी सुरु केली. 'बघा वहिनी, मी मागं राहिलों म्हणून बरं झालं कीं नाहीं तें ! रात्रीं थोडी विश्रांति घेऊन भल्या पहाटे तुम्हाला गाठावें म्हणून मी निघालों. वाटेमधें रस्त्यांत कांहींतरी पांढरें गाठोडें पडलेलें दिसलें. तें तुमचेंच असावें अशा समजुतीनें जवळ जाऊन उतरलों, तों तें गाठोडेंच माझ्याशीं बोलूं लागलें, ''विठूकाका विठूकाका'' म्हणून.मी अगदीं सर्दच झालों. पाहतों तों आपले छोटे चिरंजीव. स्वारी लोळत लोळत गाडीच्या कडेला आली असावी आणि मधेंच बसलेल्या एकाद्या गचक्यानें अलद खालीं आली असावी. मग काय घेतला त्याला उचलून आणि केली जराशीं गम्मत तुमची. '

या शब्दानें साऱ्या मंडळींत हंशाच पिकला. छोटा माधवाहि हंसूं लागला. त्याच्या आईचा आनंद तर गगनांत मावत नव्हता. थोडयाच वेळांत त्यांचा प्रवास सुरू झाला.

## जन्म

या प्रसंगांतील छोटा माधव म्हणजेच आपले चरित्रनायक न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे होत. या वेळीं छोटा माधव अवघा दोनअडीच वर्षांचा होता. कोल्हापूर येथें त्याचे वडील गोविंदराव

या वेळीं नोकरीस होते. तिकडे तो आपल्या आईबरोबर निघाला होता. इतके दिवस गोपिकाबाई नाशिक जिल्ह्यांतील निफाड या गांवीं आपल्या आजेसासूजवळ होत्या. गोविंदरावहि सुरवातीस कांहीं दिवस येथेंच नोकरीवर होते. निफाड येथेंच ता. १८ जानेवारी १८४२ रोजीं माधवाचा जन्म झाला. हा दिवस मंगळवारचा असून मराठी कालगणनेप्रमाणें तो शके १७६३ मधील माघ शु. ६ चा होता.

## वाडवडील

गोविंदरावांचे वडील अमृतरावतात्या हे नुकत्याच सुरू झालेल्या इंग्रज सरकारचे राज्यांतील मुलकी खात्यांत नौकरीस होते. नगर जिल्ह्यांत ते शिरस्तेदार असतां त्यांनीं आपल्या मुलाला—गोविंद-रावांना—नौकरींत लावून घेतलें. माधवाचे जन्माचे वेळेस गोविंदराव नगर जिल्ह्यांतच दुय्यम कलेक्टरचे हाताखालीं एक कारकून होते. त्या वेळीं त्यांना फारतर तीस किंवा पसतीस रुपये पगार असावा. तरी पण त्यांचे वडील मामलतदारीपर्यंत चढले असल्यामुळें त्यांच्या घरची परिस्थिति एकंदरींत चांगली होती असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं.

## मुलाचा पायगुण

पण माधवाच्या जन्माचे वेळेपासून गोविंदरावांना ऊर्जितावस्था प्राप्त झाली. ज्यानें आपल्या बुद्धिमत्तेनें व कर्तबगारीनें साऱ्या भरत-वर्षाचें भवितव्य उज्ज्वल केलें, त्याच्या पायगुणानें वडिलांना चांगले दिवस आले असतील यांत आश्चर्य तें कसलें! नगर जिल्ह्यांतील मुलकी खात्यांत काम करतांना गोविंदरावांवर त्यांच्या साहेबाची मर्जी प्रसन्न झाली व माधवाचे जन्मानंतर थोडक्याच दिवसांत या अधि-

काऱ्यानें गोविंदरावांना शिफारसपत्र देऊन कोल्हापूर संस्थानांत पाठविलें. तेथेंच त्यांना जबाबनिशीचें काम मिळालें.

सुरवातीस गोविंदराव आपली मंडळी व मुलगा निफाडासच ठेवून एकटेच कोल्हापुरास आले होते. तेथें जरा जम बसतांच दोन वर्षांनीं आपल्या मंडळीस त्यांनीं बोलावून घेतलें होतें. याच प्रवासांत वर वर्णिलेला घोर प्रसंग छोटथा माधवावर आलेला होता. कोल्हापुरास आल्यावर पहिले कांहीं दिवस गोविंदराव जबाबनिशीचे कामावर होते. पुढें हळूहळू ते आपल्या कर्तबगारीचे जोरावर वरवर चढत गेले. कांहीं दिवसांनीं मामलेदार झाल्यावर त्यांना निरनिराळ्या ठिकाणीं हिंडावें लागलें. पण अखेर १८६२ चे सुमारास त्यांना कायमचे खासगी कारभारी म्हणून नेमण्यांत आलें.

## शुद्ध नंदी

कोल्हापुरास आपले वडिलांचे जवळ राहावयास आल्यावर कांहीं दिवसांनीं वयाच्या सहाव्या वर्षीं माधवास शाळेंत घालण्यांत आलें. तरतरी आणि हुशारी या गुणांचा या वेळीं माधवामधें पूर्णांशानें अभाव होता असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. अंगापिंडानें धिप्पाड आणि वागण्यांत गबाळ यामुळें कांहीं लोक त्याला शुद्ध नंदी म्हणून संबोधीत. त्यांतून स्वारीचा स्वभाव अगदीं घुम्या व माणूसघाण्या; आणि कधींमधीं बाळानें तोंड उघडलें तर बोबडे शब्दोच्चार. या गुणसमुच्चयामुळें या आपल्या ‘ वेडथा गोळ्याचें ’ पुढें कसें होणार अशी त्याच्या आईवडिलांस काळजी पडली असल्यास नवल नाहीं ?

आणि या दोषांमुळें जे कांहीं थोडेसे गुण बाळाचे अंगीं अधूनमधून डोकावत त्यांच्याकडेहि त्याच्या लहानशा वयोमानामुळें सर्वजण दोषैक दृष्टीनेंच पहात. मामलेदाराचा एकुलता एक मुलगा हा.

त्याची आई मोठ्या प्रेमानें सणावाराच्या दिवशीं बाळाला दागिन्यांनीं सजवत असे. पण बाळ कसलं अवगुणी ! त्याला दागिन्यांची लाजच वाटे. अर्थात् आईच्या हट्टापुढें येवढ्याशा बाळाचा हट्ट कसा पुरा पडणार ! कसें बसें आई त्याला दागिन्यांनीं मढविल्याशिवाय रहात नसेच. पण बाळहि कांहीं कमी नव्हतें पराक्रमी. घराबाहेर येतांच बाळाचा पहिला उद्योग म्हणजे आपल्या कपड्या-खालीं सारे दागिने दडवून ठेवावयाचा. हातांत अंगठी असली तर अशा तऱ्हेनें मूठ मिटून घ्यावयाची कीं ती आंगठी कोणाला दिसूंच नये ! ही त्याची वागणूक पाहून एकदां त्याच्या आत्याबाईनें त्याला विचारलें, "हें रे काय माधवा, किती कौतुकानें तुझी आई तुला दागिने घालते आणि तूं असे वेड्यासारखे लपवून काय ठेवतोस ?"

पण यावर वरवर वेडपट दिसणाऱ्या माधवानें असें कांहीं उत्तर दिलें कीं तें शहाण्यानाहि सहसा सुचूं नये. तो म्हणाला, "आपल्या घरीं इतकीं मुलें येतात माधुकरी मागायला, त्यांच्या-पैकीं एकाच्याहि अंगावर कधीं दागिने दिसत नाहींत. तीहि मुलें, व मीहि एक मुलगाच. मग माझ्यावरच कां तुमचा जुलूम ?"

या त्यांच्या उत्तरानें निरुत्तर झालेल्या त्याच्या आत्याबाईनें फारतर 'वेडपट आहे झालं पोर' असा शेरा मारला असावा. काय गम्मत आहे पहा. ज्या साधेपणाबद्दल सारे लोक माधवरावांचें पुढें कौतुक करीत त्याच माधवरावांना या वेळीं वेडपट म्हणून घ्यावें लागलें. त्यांच्या सरळ आणि एकमार्गी स्वभावावरहि दुर्गुणाचा आरोप या वेळीं करण्यांत येत असे.

## खाऊची गम्मत

एकदां काय झालें, छोटा माधव कुठें तरी दमून घरीं आला. घरीं येतांच त्यानें आईपाशीं कांहीं खावयास मागितलें. त्या वेळीं

समोरच मोलकरणीचा एक छोटा मुलगा खेळत होता. आईनें घरांतून एक डबा आणला. डब्यांत बर्फी होती. माधवास देतां देतां या गरीब मुलासहि थोडासा खाऊ द्यावा असें त्या माउलीच्या मनांत आलें. तिनें एक मोठा तुकडा माधवास म्हणून व एक छोटा तुकडा त्या मुलासाठीं असे दोन्ही माधवाच्या हातांवर ठेविले. व माधवास एक तुकडा त्या मुलास द्यावयास सांगितलें. पण पहाते तों माधवानें लहान तुकडा स्वतःच्या तोंडांत टाकला व मोठा त्या मुलाला दिला. "हें रे काय माधवा केलेंस तूं वेडयासारखें ?" तिनें आश्चर्यचकित होऊन विचारलें. "तूंच मला सांगितलं होतंस ना कीं तो तुकडा त्या मुलाला दे म्हणून !" तेव्हां कुठं त्या माउलीच्या लक्षांत आलं कीं आपण कोणता तुकडा तें सांगण्यांत चूक केली म्हणून असं झालं. दुसरा एकादा मुलगा असतां तर त्यानें मोठाच काय पण दोन्हीहि तुकडे तोंडांत टाकून तेथून पलायन केलें असतें. व त्याच्या आईनें फारतर 'लबाडा' असें अर्धवट रागानें म्हणून त्या मोलकरणीच्या मुलाला आणखी एकादा तुकडा दिला असता. पण येथें माधवाला त्याच्या सरळपणाबद्दल स्वतःला वेडा म्हणून घ्यावें लागलें. त्याच्या सरळपणाचीहि अशीच एक दंतकथा सांगतात.

## पातळ तूप

तो मराठी शाळेंत असतां त्यांची शाळा सकाळीं असे. शाळेंतून परत येण्यास दहा साडेदहा होत व या वेळपर्यंत माधवास खूप भूक लागत असे. म्हणून शाळेंतून येतांच त्याची आई रोज त्याला दशमी खावयास देई. आणि या रोजच्या न्याहरीच्या दशमीबरोबर त्याला पातळ तूप खाण्याची संवय झाली होती. इतकी कीं एकादे दिवशीं पातळ तूप नसलें कीं

स्वारीचें सारें गाडें पार बिघडून जाई. एक दिवशीं असेंच झालें. घरांत पातळ तूप शिल्लक नव्हतें आणि माधवाची स्वारी तर अगदीं अडून बसलेली. तेव्हां त्याच्या चतुर आईनें केली एक युक्ती. तिनें नेहमीचें तुपाचें तांबलें घेतलें, त्यांत थोडेसें पाणी माधवाच्या नकळत घातलें व ती तांबली जरा वेळ चुलीवर ठेवून त्यांतले चार थेंब घातले माधवाच्या दशमीवर. पण मूल सरळमार्गी येवढें कीं त्याचें तेवढयानें समाधान झालें व दशमी पार संपवून तो बाहेर गेलासुद्धां. त्याच्यापेक्षां दोन वर्षांनीं लहान असलेली बहीण दुर्गी ही त्याच्या मानानें पुष्कळच चलाख होती. तिनें आईची युक्ति ओळखली व ती माधवाला चिडवूं लागली. पण एकदां पातळ तूप मिळाल्याचें समाधान पावलेला माधव शांत होता. अशा चिडवण्याला त्यानें यत्किंचितहि भीक घातली नाहीं. मास्तरांनीं शिकविलेल्या एखाद्या पाठाचा त्याला इतका नाद लागे कीं मग दिवसभर याचा आपला तोच नाद चाले. ज्या दिवशीं शाळेंत तो धुळाक्षरें शिकला त्या-दिवशीं तर दिवसभर तो हातानें भिंतीवर व रस्त्यांतील धुळीवर वाटेल तेथें धुळाक्षरें काढीत सुटला होता.

## तासन् तास संध्या

एकादें काम करतांना त्याला कोणी अडथळा केलेला त्याला खपत नसे. परत ती गोष्ट तो सुरवातीपासून करूं लागे. मुंज झाल्यावर संध्येच्या वेळीं तर अशी मौज वारंवार उडे. याची संध्या अगदीं जोरजोरानें चालत असे आणि मधेंच कोणीतरी त्याला नक्कीच बोलावयास लावी. मग झाली याची पुन्हां पहिल्यापासून संध्येला सुरवात. अशा तऱ्हेनें कधीं कधीं तासन् तास संध्या चाले स्वारीची. एकदां तर पंचाईतच झाली सारी. संध्येला सुरवात होऊन निम्याचे वर आली होती. आणि येवढ्यांत नेहमींप्रमाणें विठूकाकांनीं त्याचेशीं

संध्येंतीलच कांहीं बोलणें सुरु केलें. पण त्याबरोबर स्वारी जी गप्प बसली ती विठूकाकांशीं एक शब्दहि बोलेना, येवढेंच नव्हे तर संध्याहि पुरी करेना. एकाद्या सत्याग्रही वीराप्रमाणें तो तेथेंच स्तब्ध बसून राहिला. असें बसण्याचें कारण विचारतांच तो निग्रहानें उत्तरला, ' संध्या केल्याशिवाय मी उठवणार नाहींच. पण पुन्हा सुरवातीपासूनहि संध्या करणार नाहीं. माझी संध्या कोठवर थांबली तेथपर्यंत मला संध्या आणून द्या, तरच मी संध्या पुरी करीन, नाहींतर असाच बसेन. ' हें त्याचें निग्रहाचें उत्तर ऐकतांच विठूकाकांनीं मुकाट्यानें संध्या सुरू केली व निम्यावर येतांच त्याला पुरी करावयास सांगितली, तेव्हां कुठें बाबानें संध्या पुरी केली व उठला त्या जागेवरून ! आणि या दुर्गुणा (?) बरोबर आणखी एक दुर्गुण त्याचे अंगीं दिसून येई. तो म्हणजे एकाद्या पोक्त समजूतदार माणसास शोभेल असा धिम्मेपणा या वेळपासून त्याचे अंगीं बाणला होता.

वास्तविक याच तऱ्हेच्या वागणुकीचा माधवरावांच्या पुढल्या आयुष्यांत मोठा बोलबाला होऊन या त्यांच्या गुणांची वाखाणणी झाली. धुळाक्षरें दिवसभर गिरविण्यांत जी त्यांची चिकाटी दिसली तीच पुढें वाचनाचे बाबतींत दिसून आली. म्हणूनच आजहि त्यांनीं अभ्यासासाठीं वाचलेल्या पुस्तकांची नुसती यादी वाचूनच सारे लोक आश्चर्यानें तोंडांत बोटें घालतात. दागिने न घालूं देण्यांतील त्यांचा साधेपणा त्यांच्या साऱ्या आयुष्यांत पहावयास सांपडला. पण या वेळीं मात्र या गुणांकडे त्यांच्या बालवयामुळें सारे लोक दोषैक दृष्टीनें पहात असत यांत शंका नाहीं. राजहंसाबद्दल असेंच सांगतात. राजहंस वयांत येईपर्यंत एकाद्या सामान्य बगळ्याहूनहि तो अतिकुरूप असतो, व त्यामुळें सारेजण त्याची हेटाळणी करतात.

पण एकदां का वयांत येऊन त्याला राजहंसाचें नवें तेज येतें, तेव्हां सारे जण त्याच्या तेजानें दिपून जाऊन त्याच्या सौंदर्याचे पवाडे गाऊं लागतात.

## गोपिकाबाईंचा त्रागा

वयाच्या सहाव्या वर्षी माधवाला मराठी शाळेंत घालण्यांत आला होता हें वर आलेंच आहे; व या वेळीं शाळेंत त्यानें आपल्या कोणत्याहि गुणाची चमक दाखविली नाहीं हेंहि ओघानें आलेलें आहे. पुढें थोडया दिवसांनीं कोल्हापूर येथें १८५२ मध्यें एक इंग्रजी शाळा निघाली. हेंच आजचें प्रसिद्ध राजाराम हायस्कूल. मराठी शाळेचें शिक्षण पुरें होतांच त्याच वर्षी माधवाला इंग्रजी शाळेंत घालण्यांत आलें. पण या वेळीं इंग्रजी शिकण्याविषयीं जुन्या लोकांचा विशेषतः बायकांचा फार वाईट ग्रह होता. इंग्रजी शिकणें म्हणजे बिघडणें,—पार वाया जाणें—अशी सर्वसाधारण समजूत होती. अर्थात् आपला मुलगा इंग्रजी शाळेंत जाऊन शिकतो हें गोपिका-बाईंना पसंत पडेना. त्यांनीं ताबडतोब त्याचे शाळेंत जाणें बंद करून टाकलें. माधवाचें काय ? तो स्वस्थ घरीं बसला. एकदोन दिवसांत आपला मुलगा शाळेंत जात नाहीं हें कानीं येतांच गोविंदरावांनीं सौम्य शब्दांत पत्नीची हजेरी घेऊन माधवाला शाळेंत जाण्यास फर्माविलें. बिचारा माधव परत शाळेंत जाऊं लागला. पण या गोष्टीचें गोपिकाबाईंना इतकें दुःख झालें कीं त्यांनीं अन्नपाणी वर्ज्य केलें. तीन दिवस असेच गेले. या पेंचप्रसंगाने छोटया माधवाचे शिक्षणांत मोठेंच विघ्न आलें.

पण गोपिकाबाईंच्या या आततायीपणानें गोविंदरावांचें मन यत्किंचितहि ढळलें नाहीं. शेवटीं गोपिकाबाईंचें मन वळ-विण्यांत त्यांना कसेंबसें यश मिळालें. पण याचा परिणाम असा

झाला कीं कोल्हापुरांत चांगलें इंग्रजी शिक्षण मिळत नसल्यामुळें माधवाला कोठें बाहेर पाठवावा अशी जी त्यांची मनीषा होती ती एव्हांच फळाला आली नाहीं. जी आई मुळांतच मुलाला इंग्रजी शिकविण्याचे विरुद्ध होती ती मुलाला दूर कशी पाठविण्यास तयार होईल ? आणि याला आणखीहि एक कारण होतें. गोपिकाबाईंना मुलें पुष्कळच झालीं होतीं. पण त्यांतलीं वांचलीं दोनच. एक माधव व दुसरी दुर्गा. त्यामुळें माधवाचे बाबतींत त्यांचें मन फारच हळवें झालें होतें. आणि म्हणूनच कोल्हापूर येथेंच कां होईना पण माधवाचें इंग्रजी शिक्षण सुरू आहे ना, येवढ्यावरच गोविंदरावांना समाधान मानावें लागे.

## दोन कुटुंबें पण एक दिल

याच वेळीं या रानडेमंडळींना एक उत्तम शेजार मिळाला होता. कीर्तने हें त्या कुटुंबाचें नांव. जनार्दन हरी कीर्तने हे या वेळीं कोल्हापूर संस्थानचे कारभारी होते. हीं दोन्हीं कुटुंबें एकाच घरांत रहात असत. माडीवर कीर्तने व खालच्या मजल्यावर रानडे यांचें बिऱ्हाड. माधव व दुर्गा आणि कीर्तन्यांचीं मुलें यांची चांगलीच मैत्री जमली होती. इतकी कीं यांच्या एकमेकांतील घरोब्यामुळें आणि प्रेमळ वागणुकीनें हीं दोन कुटुंबें नसून एकच आहेत अशी तिऱ्हाइतांची समजूत होत असे. फार कशाला ? एकादा सण एका घरीं करावयाचा ठरला तर त्या दिवशीं दुसऱ्या घरीं चूलसुद्धां पेटली जात नसे. लहानाप्रमाणें मोठ्या माणसांतहि आपपर भावाचा लोप झाला होता. त्यांतल्यात्यांत रानड्यांचा माधव आणि कीर्तन्यांचा विनायक हे अगदीं एका वयाचे, एका वर्गांतले असल्यामुळें या दोघांचा फार स्नेह होता. तरपिण या दोन मित्रांत स्वभावसाम्यापेक्षां भिन्नत्वच अधिक होतें. माधव अति-

शय थंड तर विनायक अतिशय तापट, माधव अतिशय शांत तर विनायक चळवळ्या, माधव मुखस्तंभ तर विनायक म्हणजे नारोशंकराची घंटा. कोठलीहि गोष्ट विनायकाला चटकन् कळे तर माधवाला ती गोष्ट कळावयाला बराच वेळ लागे. पण या बरोबरच एकदां कळलेली गोष्ट विनायक चटकन् विसरून जाई तर माधवाचे ठिकाणीं ती अगदीं वज्रलेप असे. असा भिन्न स्वभाव असूनसुद्धां या दोघांत चांगलीच मैत्री होती.

## पोराला हौसच नाहीं

एकादी परीक्षा पास झाली कीं इतर मुलांबरोबर विनायकाचा काय आनंदोत्सव चालावयाचा. पण माधवाचें अगदीं उलट. तो अगदीं शांत असावयाचा. एखाद्या उथळ समुद्रांत लाटांचा जोर दिसावा ना तसे परीक्षांचे निकालाचे दिवशीं विनायकादि इतर मुलांचें होऊन जाई. पण कसल्याहि प्रसंगीं अतिशय खोल महासागरावर कशाचाच परिणाम वर दिसून येत नाहीं, तशीच माधवाची स्थिति असे. "अरे माधवा! तूं पास झालास—मग आम्हांला कुठें सांगितले नाहींस! तुला कांहींच आनंद वाटत नाहीं?" असें त्याच्या गांभीर्याला छेडून त्याला कोणी विचारल्यास शांतपणानें तो उत्तर देई, "आम्ही अभ्यास करतों तो पास होण्यासाठींच ना? मग वर्षभर अभ्यास करून पास झाल्यावर त्यांत येवढा आनंद तो काय मानावयाचा आणि येवढें नाचावयाचें तें काय?" या त्याच्या अर्थपूर्ण उद्गारांनीं स्तिमित झालेले लोक 'पोराला हौसच नाहीं' यापलीकडे काय शेरा मारूं शकणार?

## खांबाकडून बिनतोडी

अगदीं याच वेळेला याच लहान वयांत माधवाबद्दल जी एक गोष्ट सांगतात ती ऐकून हा मुलगा खरोखर न्यायमूर्ति व्हावयालाच

जन्माला आला असें पटल्यावांचून रहात नाहीं. आश्विनांतील पौर्णिमेला–कोजागिरीला–रात्रीं जाग्रण करून सोंगट्या वगैरे खेळावयाच्या, व सर्वांनीं त्या रात्रीं दूध पिऊन दोनचे सुमारास झोंपावयाचें असा या रानडे–कीर्तने कुटुंबाचा प्रघात होता. बरींच वर्षें अगदीं नेमानें हा क्रम चालला होता. पण एके वर्षीं या कार्यक्रमांत खंड पडण्याचा प्रसंग आला. कीर्तन्यांची मंडळी कांहीं कामानिमित्त दुसऱ्या गांवीं गेलीं होतीं. त्यामुळें त्या रात्रीं कोणीच जागणार नाहीं असें सर्वांना वाटलें. माधवाच्या सोबतीला खेळावयास कोणीच नव्हतें. त्याची धाकटी बहीण दुर्गी ही नाहीं म्हणावयाला होती. तिच्याकडून त्या रात्रीं खेळावयाचें माधवानें कबूल करून घेतलें होतें. तरीसुद्धां बालवयानुसार ती आठ वाजतांच झोपली. पण माधवाचा निश्चय कायम होता. सगळेजण जेवणें होऊन निजावयास गेल्यावर त्यानें आपल्या आत्याबाईपाशीं सोंगट्या मागून घेतल्या व एका खांबाशीं जाऊन त्या खांबालाच भिडू करून खेळावयास सुरवात केली. एक हात खांबाचा व एक हात आपला असें मनानें ठरविलें व त्याप्रमाणें खेळास सुरवात झाली. दोन डाव झाले तरी दोन्ही डावांत खांबाचीच सरशी झाली. दोन्ही वेळां खांबाकडूनच त्याला बिनतोडी मिळाल्या. झाली होती काय गम्मत, कीं पाहिल्यांदा हा हात खांबाचा असें ठरवितांना सहजच उजवा हात पुढें आला व एकदां ठरलें तें कायम. मग त्यांत आपला पराभव झाला तरी बदलणें शक्य नव्हतें. आणि पराभव होणार नाहीं तर काय ? डाव्या हाताला दान पडणार कसें आणि उजव्या हाताचा पराभव व्हावा कसा ? पण ही साधी व्यवहारी गोष्ट सुद्धां माधवाच्या लक्षांत आली नाहीं. हा पोरगा कुणाशीं खेळत आहे हें पहावयास आलेल्या आत्याबाईला ही गम्मत पाहून सहजच हंसूं आलें व त्याला चिडविण्याकरतां त्या म्हणाल्या,

“ काय पण फजिती एका माणसाची. साध्या लाकडी खांबानें सुद्धां बिनतोडी द्याव्या ना! ” त्यावर न चिडतां शांतपणानें माधवानें उत्तर दिलें “ त्यांत काय ? जें खरें तें खरें. खांबाच्या हाताला डाव पडला म्हणून त्याची तोड आधीं झाली. मला पडला नाहीं, म्हणून माझी झाली नाहीं. यांत कसली फजिती ? ”

साध्या खेळांमधील स्वार्थाचे बाबतींत सुद्धां जो इतका न्यायनिष्ठुर त्याची जागा या जगांत न्यायमूर्तींच्या परमपवित्र जागेशिवाय दुसरीकडे कोठें असणार ?

## मातेचा मृत्यु

इंग्रजी शाळेंत शिकावयास लागून थोडे दिवस होतात न होतात तोंच माधवाची आई गोपिकाबाई स्वर्गवासी झाल्या. या वेळेस माधव अवघा अकरा वर्षांचा व धाकटी बहीण दुर्गी नऊ वर्षांची होती. आपल्या आईच्या मरणानंतर अवघ्या सोळाव्या दिवशींच वडिलांनीं आपल्या आईची जागा भरून काढलेली पाहून माधवाच्या कोंवळ्या मनास काय वाटलें असेल ? पुढें थोड्याच दिवसांनीं खुद्द माधवाच्या लग्नाचा बार उडविण्यांत आला. अवघ्या बाराव्या वर्षीं वाईच्या दांडेकर घराण्यांतल्या एका मुलीशीं त्याचें लग्न लागलें. त्याची धाकटी बहीण दुर्गी हिचेंहि याच वेळीं लग्न करण्यांत आलें.

हळूहळू आपल्या घरांत माधवाचें मन रमेनासें झालें. आधींच तो फारसा कोणाशीं बोलत नसे आणि आतां घरांतील सख्खे सावत्र वातावरण पाहून तर तो अधिकच उद्विग्न झाला. याच वेळेस म्हणजे साधारणपणें १८५६ चे सुमारास कोल्हापूर येथें जेवढें इंग्रजी शिक्षण मिळत असे तेवढें माधवानें पुरें केलें होतें. अर्थातच पुढील

शिक्षणासाठीं मुंबईला जावें असें त्याचे मनानें घेतलें. पण आपली ही कल्पना वडिलांस कशी सांगावी ही त्याला पंचाईत वाटूं लागली. वडिलांशीं कांहींहि मागण्याची वा बोलण्याची त्याला संवय नव्हती. त्यांचे शेजारीं जनार्दनपंत यांना माधवाबद्दल फार प्रेम वाटत होतें व त्यांचेशींच माधव अनेक वेळां मनमोकळे-पणानें बोलत असे. या वेळीं त्यांचेच मागें माधवानें मुंबईला धाडण्याबद्दल टुमणें लावलें.

## मुंबईस प्रयाण

अखेर त्यांनींहि आपलीं मुलें मुंबईस पाठविण्याचें ठरविलें. अशा तऱ्हेनें १८५६ च्या अखेरीस माधव व कीर्तन्यांचा विनायक वगैरे एकदोन मुलें अशी मंडळी विद्याभ्यासासाठीं मुंबईस निघाली. कोल्हापूर संस्थानच्या कारभाऱ्याची आणि खाजगी कारभाऱ्यांचीं मुलें तीं. त्यांची व्यवस्था चोख असेल यांत नवल कसलें !

माधवराव मुंबईला येतांच त्यांनीं एल्फिन्स्टन हायस्कूलमधें नांव घातलें. याच वर्षीं म्हणजे सन १८५७ मध्यें मुंबई युनिव्ह-र्सिटी स्थापन झाली. पुढील वर्षीं शाळेचा अभ्यासक्रम पुरा करून ते कॉलेजमध्यें प्रविष्ट झाले. एल्फिन्स्टन कॉलेज त्या वेळीं फार प्रसिद्ध होतें. १८५९ सालीं मुंबई विद्यापीठाची पहिली मॅट्रिक परीक्षा झाली. जरी माधवराव आणि त्यांचे कांहीं इतर सहाध्यायी यापूर्वींच कॉलेजमध्यें गेले होते तरी त्यांना या मॅट्रिकच्या परीक्षेस बसावें लागलें. यापूर्वीं शाळेच्या परिक्षेच्या निकालावरच कॉलेजमधें प्रवेश मिळत असे. पण याच वेळेपासून इलाखाभर मुंबई विद्या-पीठाची ही मॅट्रिक परीक्षा सुरू झाली; व यापुढें ही परीक्षा पास होणाऱ्यासच कॉलेजांत प्रवेश मिळूं लागला.

मुंबईस शिक्षणास येतांच माधवरावामध्यें बराच मोठा बदल घडून आला. त्यांचा पूर्वींचा स्वभाव बदलला असें नव्हे तर लहानपणीं जो स्वभाव आणि जे गुण त्यांचे वयास शोभत नसत तेच आतां त्यांना शोभून दिसूं लागले. येवढेंच नव्हे तर त्याच गुणांमुळें ते आतां यशाच्या एकेक पायऱ्या चढून जाऊं लागले. त्यांच्या बुद्धिरूपी कळीचा आतां विकास होऊन तिचा सुवास चोहोंकडे दरवळूं लागला. थोडक्यांत म्हणजे वर एके ठिकाणीं लिहिल्याप्रमाणें राजहंस वयांत येण्याचे दिवस आले आणि त्यामुळें या नव्या गुणांनीं आणि नव्या स्वरूपानें आजूबाजूचे लोक स्तिमित होऊं लागले.

## असामान्य कोटींतील मुलगा

मुंबईस आल्यापासून माधवराव पुस्तकांतला एक किडा बनले होते असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. शाळेंत येतांच पहिल्या कांहीं दिवसांतच या नव्या मुलानें आपल्या शाळेच्या पारशी मुख्याध्यापकास आपल्या बुद्धिप्रभावानें असें कांहीं चकित केलें कीं त्यानें 'हा मुलगा असामान्य कोटींतला असून भविष्यकाळीं मोठा कीर्तिमान पुरुष होणार' असें भाकित करून ठेविलें. प्रसिद्ध संस्कृत पंडित सर डॉ.भांडारकर हे त्या वेळीं त्यांचे एक सहाध्यायी होते. त्यांनीं या वेळच्या माधवरावांचें उत्तम शब्दचित्र रेखाटलें आहे तें पाहण्याजोगें आहे. "माधवरावजी १८९६ चे सुमारास कोल्हापुराहून मुंबईस आले. तेव्हांच माझी व त्यांची ओळख झाली. फणसवाडींतल्या चाळींत आमच्याबरोबरच ते रहावयास आले. सोबत्याबरोबर गप्पागोष्टी करण्यांत ते आपला वेळ कधींच घालवीत नसत. त्यांची कोणाशीं विशेष ओळख नव्हती व त्यांनीं करूनाहि घेतली नाहीं. दिवसारात्रीं ते सारखे वाचनांत निमग्न असत......

परीक्षेच्या अभ्यासाबाहेरचे गिबनच्या इतिहासासारखे मोठमोठे ग्रंथ वाचण्यांत दोनदोन वाजेपर्यंत गुंग झालेले माधवरावजी आपल्या खोलींत दिसत. ''

## असामान्य वाचन

कॉलेजमधें येतांच तर माधवरावांच्या ज्ञानार्जनाला अक्षरशः ऊत आला होता. नेमलेल्या आवश्यक अभ्यासाबरोबरच ऐच्छिक अतएव अनावश्यक असे अनेक विषयांचे वर्ग कॉलेजमधें भरत असत. रसायनशास्त्र, लॅटिन, इत्यादि सर्व विषयांच्या तासांना नियमानें हजर राहून त्याहि विषयांचा सांगोपांग अभ्यास करावयास ते चुकत नसत. या काळांत नवेनवे ग्रंथ वाचावयाचे व जुन्यांचीं पारायणें करावयाचीं याच गोष्टींत त्यांना अत्यानंद वाटत असे. कॉलेजच्या या दोन तीन वर्षांच्या आयुष्यक्रमांत त्यांनीं अभ्यासा-व्यतिरिक्त जीं पुस्तकें अभ्यासिलीं त्यांची यादी उपलब्ध आहे. ती यादी वाचतांच कोणालाहि अपरिमित आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं.

इ. स. १८६२ सालीं बहुमानासह पहिल्या वर्गांत ते बी. ए. ची परीक्षा पास झाले. या वेळीं हल्लींच्या सारखी ऑनर्सची परीक्षा एकच नसे. बी. ए. झाल्यानंतर स्वतंत्रपणें ऑनर्सची परीक्षा घेण्यांत येई. या परिक्षेलाहि माधवराव बसले व उत्तीर्ण झाले. या परीक्षेसाठीं किती अभ्यास केला हें स्वतः माधवरावांनींच लिहून ठेविलें आहे. " या ऑनर्सच्या परीक्षेसाठीं मीं ठोकळ अंदाजानें माफक आकाराचीं पंचवीस हजार पानें वाचलीं. व एकाच विषया-वरील निरनिराळ्या पुस्तकांतील तुलनात्मक टिपणें करून १०० कागद लिहिले. '' काय हा दांडगा व्यासंग ! इतक्या तपश्चर्येनंतर उज्ज्वल यश मिळणार यांत काय संशय.

## छात्रवृत्ति जप्त

प्रचंड वाचनाबरोबर त्यांचें मननहि चालू असें. अर्थात् त्या बरोबर त्यांची विचारशक्तिहि प्रदीर्घ होऊं लागली. मॅट्रिकच्या परीक्षेपासूनच अगदीं साध्या परिक्षेंतील निबंधांमधूनहि माधवरावांची एक विलक्षण चमक दिसून येऊं लागली. मॅट्रिकच्या परिक्षेंतील एका निबंधांत त्यांनीं इंग्रजी राज्यावर चांगलेच कोरडे ओढले होते. अर्थात् ती वेळ निराळी असल्यामुळें त्यांच्या या स्पष्टवक्तेपणाबद्दल शासन म्हणून योग्य रीतीनें जे मार्क त्यांना मिळावयाचे ते न मिळतां जरा कमी देण्यांत आले होते. पण या शासनाचें त्यांना कांहींच वाटलें नसावें. कारण कॉलेजमध्यें असतां त्यांनीं पुन्हां एकदां शिवाजी व इंग्रज यांच्या राज्यपद्धतींची तुलना करण्याचे निमित्तानें इंग्रजी राज्यपद्धतिवर पद्धतशिर हल्ला केला होता. पण या वेळीं हा हल्ला त्यांचेवरंच उलटला. त्यावेळचे प्रिन्सिपल ॲलेक्झांडर ग्रँट यांनीं त्यांना चांगलाच धडा शिकवला. माधवरावांची त्यांनीं चांगलीच कानउघाडणी केली व सहा महिनेपर्यंत त्यांनीं त्यांची छात्रवृत्ति रद्द करून कायमचें लक्षांत राहील असें प्रायश्चित्त त्यांनीं त्यांच्या घोडचुकीसाठीं दिलें.

अगदीं या वेळपासून मराठ्यांच्या इतिहासाबद्दल माधवरावांना किती प्रेम होतें हें उघड होतें. याचाच परिपाक म्हणून पुढें माधवरावांनीं 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' हें उत्कृष्ट पुस्तक लिहिलें आहे.

## 'पदवीधरमुकुटमणी'

इ. स. १८५९ मध्यें जो ज्ञानयज्ञ त्यांनीं सुरू केला होता तो १८६६ सालीं संपविला. येवढ्या कालांत प्रत्येक परीक्षा ते बहुमानानें उत्तीर्ण झाले. अपयश कसें तें त्यांना ठाऊक नव्हतेच. पण प्रत्येक परीक्षेंत पहिला वर्ग मिळवून त्यांनीं आपल्या सहाध्यायांना

पार मागें टाकलें होतें. त्यांचे सहाध्यायी कांहीं साधेसुधे नव्हते. सर डॉ. भांडारकर, बाळ मंगेश वागळे, फेरोजशहा मेहता, वामन आबाजी मोडक, आबाजी विष्णु काथवटे, महादेव मोरेश्वर कुंटे, शंकर पांडुरंग पंडित वगैरे मंडळी थोड्याशा अंतरानें त्यांचे पुढें मागें होती. या साऱ्या मंडळींनीं माधवरावांचें अद्वितीयत्व निरनिराळ्या वेळीं कबूल केलें आहे. इ. स. १८६२ मध्यें ते पहिल्या वर्गात पास झाले. १८६४ त ते एम. ए. झाले आणि १८६६ त एलएल. बी. झाले. त्यांचे सहाध्यायी वा त्यांचे प्राध्यापक हेच त्यांच्या अद्वितीयत्वानें दिपून गेले होते असें नव्हे तर बडे सरकारी अधिकारीहि माधवरावांच्या या यशाकडे सकौतुक पहात असत. इ. स. १८६२ सालीं मुंबई विद्यापीठाचा पहिला पदवीदान समारंभ त्या वेळचे गव्हर्नर फ्रियर साहेब यांचे हस्तें झाला. तसेंच १८६५ व १८६६ (कीं ज्या सालांत माधवरावांनीं एम्. ए. व एलएल. बी. या पदव्या घेतल्या) सालांतहि वर उल्लेखिलेल्या साहेबांच्या हस्तेंच तो पदवीदानसमारंभ झाला होता. या वेळच्या फ्रिअर साहेबांच्या व्याख्यानांत विशेषेंकरून माधवरावांचा गौरव असेच, पण साऱ्या व्याख्यानांचा विषयहि जणूं माधवरावांनाच उद्देशून असे. इतकें महत्त्व या शिक्षणाचे केंद्रांत माधवरावांना आलें होतें. म्हणूनच त्यांना सारेजण पदवीधर मुकुटमणी असें म्हणत असत.

## ‘बालमतंगज’

सर दिनशा वाच्छा यांनीं माधवरावांच्या एका इंग्रजी पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत त्यांच्या विद्यार्थीदशेचें उत्कृष्ट वर्णन केलें आहे:—“ आमच्यांपैकीं कोणालाच रानड्यांची चिकाटी, धिमेपणा आणि वाचन-लालसा या गुणांमधें बरोबरी करतां येत नसे. धिमेपणा व चिकाटी हे मराठ्यांचे स्वभावधर्मच आहेत...पण रानडे

विद्यार्थी असतांना हा चिकाटीचा जन्मसिद्ध गुण पराकाष्ठेस पोहोंचला होता असें आढळून येत असे. आमच्यांतले कांहींजण त्यांस विनोदानें 'बालमतंगज' [The infant Elephant] म्हणत असत. त्यांच्या शरीराचा बांधा धिप्पाड आणि ओबडधोबड असल्यानें हत्तीची उपमा सहज सुचे. पुढें त्यांच्या सार्वजनिक आयुष्यामध्यें जे गुण प्रकट झाले ते, अविश्रांत श्रम करणारे एक विद्यार्थी या नात्यानें या काळांतहि लक्षांत येत असत. शहरच्या चालचलणुकींचा किंवा शिष्टाचाराचा गंधहि त्यांच्या अंगीं जडला नसल्यानें आपण कांहीं विचित्र आचरण करीत आहों हे ध्यानांत न येतां ते एकाद्या बांकावर बसत व समोरच्या टेबलावर पाय ठेवून, डोक्यावर पगडी आहे कीं, आपण बोडकेच आहोंत याची फिकीर न बाळगतां वाचण्याला आरंभ करीत; आणि दुपारपासून तिन्हीसांजांपर्यंत एकाग्र चित्तानें क्षणार्धाहि विश्रांति न घेतां वाचन चालवीत. एकदां स्वारी वाचनांत गर्क झाली कीं मग त्यांना सभोंवतीं काय चाललें आहे याचें मुळींच भान उरत नसे."

डोळे बिघडले

माधवरावांचा वाचनाचा खटाटोप पाहून कोणाचीहि छाती दडपून जाईल यांत शंका नाहीं. पण या वाचनाच्या हव्यासापायीं त्यांनीं आपली दृष्टि कायमची बिघडवून घेतली. स. १८६३ च्या अखेरीस त्यांच्या डोळ्यांच्या व्यथेला सुरवात झाली. प्रथम त्यांनीं त्याकडे दुर्लक्ष करून वाचनाचा तडाखा सुरू ठेवला होताच. पण पुढील वर्षी दुखणें इतकें विकोपास गेलें कीं सहा महिनेपर्यंत त्यांना हिरव्या पट्टयानें डोळे बांधावयास डॉक्टरनीं भाग पाडलें होतें.त्या वेळचे मुंबईचे प्रसिद्ध डॉक्टर भाऊ दाजी लाड यांनीं डोळे उघडून मुळींच पाहूं नका अशी सक्त ताकीद माधवरावांना दिली होती. दररोज कोणीतरी मित्र माधवरावांना सकाळीं

डॉक्टरांचेकडे घेऊन जात असे. तेथें डॉक्टर आपल्या हातानें डोळे सोडून, धुऊन व औषध घालून पुन: पट्टा बांधीत. पण माधवरावांची अभ्यासाबद्दल इतकी आस्था कीं या सहा महिन्यांच्या काळांतहि त्यांनीं अभ्यासक्रम सोडला नाहीं. डोळे दुखत असतां देखील कांहीं सहाध्यायी मित्रमंडळीकडून वाचून घेऊन माधवरावांचें ऐकण्याचें काम चाले. हा त्यांचा डोळ्याचा अधूपणा कमी-अधिक प्रमाणांत शेवटपर्यंत होताच. एवढेंच नव्हे तर या वाचनातिरेकानें त्यांचा उजवा डोळा जवळ जवळ निकामीच झाला होता; व डावा डोळाहि सबंध शाबूत नव्हता म्हटलें तरी चालेल.

## एकडोळ्या कीं एककल्ली

तरी पण त्याची शक्ति अगदीं शेवटपर्यंत शाबूत होती, येवढेंच नव्हे तर त्यांच्या या एका डोळ्यांत येवढी शक्ती होती कीं,सामान्य माणसांना दोन्ही डोळ्यांच्या तीव्र नजरेंतूनहि जें चटकन् समजून येणार नाहीं, तें एका डोळ्यानें माधवरावांना चटकन् लक्षांत येई. त्यांच्या या एका डोळ्यांत येवढी भेदक शक्ति शेवटपर्यंत होती कीं, कुणाच्याहि अंतर्हृदयांतील कसलेंहि गुपित ते चटकन् जाणीत, असें त्यांचे मित्र सर नारायण गणेश चंदावरकर यांनीं लिहून ठेविलें आहे. थट्टेनें त्यांचे कांहीं मित्र त्यांना एकडोळ्या ( One eyed ) म्हणत, पण यावर माधवराव विनोदानें उत्तर देत, " अरे, एक डोळ्या ( One eyed ) पत्करला पण एकाच कल्पनेमधें रममाण होणार एककल्ली ( One idead ) वाईट. "

## अध्यापनकार्य

इ. स. १८६२ सालीं बी. ए. होतांक्षणींच माधवरावांचे अंगावर कॉलेजांतील अध्यापनाचें काम सोपविण्यांत आलें होतें.

बी. ए. होण्यापूर्वीच एक वर्ष त्यांना कॉलेजमध्यें फेलो म्हणून नेमण्यांत आलें होतें; व खरें म्हटलें असतां या वेळपासूनच त्यांचें अध्यापनाचें काम सुरू झालें होतें. सुरवातीस मॅट्रिकच्या वर्गास निबंधलेखन शिकविण्याचें काम त्यांचेकडे होतें. पुढें मात्र तर्कशास्त्र, इतिहास व अर्थशास्त्र, फार काय भूगोलाहि शिकविण्याचें काम त्यांचेकडे सोपविलें होतें. पुढील पदव्यांच्या प्रचंड अभ्यासाबरोबरच या अध्यापनकार्यांतील विषयांचा अभ्यास करण्याचेंहि त्यांचें काम झपाट्यानें चालत असे. कुठलाहि विषय शिकण्याचा अगर शिकविण्याचा असो,त्या विषयावर सांगोपांग व सखोल अभ्यास करण्याची त्यांची संवय असल्यामुळें त्यांना भयंकरच कष्ट घ्यावे लागत. या कष्टांत त्यांनीं कधींहि चुकारपणा केला नाहीं. एकदां इतिहास शिकविण्याचे वेळीं गिबनच्या 'रोमन साम्राज्याचा उत्कर्ष व विनाश' या पुस्तकांतील एक प्रकरण शिकविण्याचें काम माधवरावांचेकडे आलें होतें. ह्या प्रकरणांत रोमन साम्राज्यांतील कायद्यांची वाढ कशी होत गेली हा भाग आलेला आहे. हा भाग शिकवितांना, त्या कायद्याच्या विकासाची योग्य कल्पना येण्यासाठीं 'ज्यूरिस्प्रूडन्स'या विषयाचें ज्ञान असणें आवश्यक असतें. हें प्रकरण शिकविण्याची जबाबदारी अंगावर पडतांच माधवरावांनीं बरेच दिवस 'ज्यूरिस्प्रूडन्स' चा अभ्यास करून मगच तो विषय शिकविण्यास सुरवात केली. अशा तऱ्हेनें ज्या ज्या नव्या प्रांतांत, माधवराव पाऊल टाकीत त्या त्या बाबतींत अगोदर संपूर्ण माहिती ते स्वतः करून घेत. फार कशाला? मुंबई विद्यापीठानें त्यांना एकाद्या विषयाचे परीक्षक नेमलें म्हणजे त्या विषयाचाहि ते जारीनें अभ्यास करीत. बी. ए. होतांक्षणींच विद्यापीठानें त्यांना मॅट्रिकच्या मराठी विषयाचे परीक्षक नेमलें होतें.

या बाबतींतील त्यांचाच एक उतारा त्यांच्या उपरिनिर्दिष्ट वृत्तीचें द्योतक म्हणून दिला असतां योग्य होईल. " परीक्षक या नात्यानें स्वीकारलेली जबाबदारी सिद्धीस नेण्याकरतां मी ज्ञानेश्वरीचे सहा अध्याय वाचले, नवनीताच्या कित्येक भागांचीं पारायणें केलीं आणि मोरोपंतांच्या पुष्कळशा कवितांचें परिशीलन केलें. प्रश्न काढण्याचें काम मींच करावें असें ठरल्यामुळें नेमलेल्या अभ्यासक्रमाची खडान् खडा माहिती करून घेण्याखेरीज गत्यंतर नव्हतें." साधारण १८६१ पासून १८६६ पर्यंत फक्त पांचच वर्षे सुरवातीचें हें अध्यापन-कार्य त्यांचेवर पडलें होतें.

## ओरिएंटल ट्रान्स्लेटर

इ. स. १८६६ सालच्या जून महिन्यांत त्यांना मराठी ओरि-एंटल ट्रान्स्लेटरच्या जागेवर नेमण्यांत आलें. मराठी भाषेंत जें जें नवीन वाङ्मय निर्माण होईल त्या त्या वाङ्मयाचा परिचय व त्यावरील आपला अभिप्राय कळवणें हें या ट्रान्स्लेटरचें काम असतें. वास्तविक नवीन निर्माण झालेल्या वाङ्मयाची माहिती सरकारला करून देणें अतएव फक्त सरकारी कामच म्हणून सामान्य जनतेचें या कामाकडे यापूर्वी कधींच लक्ष नसे. पण माधवरावजींसारख्या प्रतिभासंपन्न आणि कष्टाळू मराठी भाषाभिमान्याकडे हें काम येतांच त्या कामाला नवीनच शोभा प्राप्त झाली. यापुढें ओरिएंटल ट्रान्स्ले-टरचे मराठी पुस्तकांवरील अभिप्राय नुसत्या सरकारी रिपोर्टांतच दडून न राहतां अधूनमधून जनतेपुढेंहि येऊं लागले; आणि त्यांत सामान्य जनतेला एका थोर साहित्यिकाचे मराठी वाङ्मया-बद्दलचे मननीय विचार आढळून येऊं लागले. अर्थात् हे त्यांचे अभिप्राय लोकप्रिय झाले असल्यास काय नवल! एका 'हिंदुस्थानच्या संक्षिप्त इतिहासाबद्दल' अभिप्राय देतांना त्यांनीं पुढील विचार प्रकट

केले होते. "ज्या ग्रंथकारानें इतिहास विषयावरील अधिकारी लेखकांचीं मोठमोठालीं पुस्तकें वाचलेलीं नाहीत, त्याची तद्विषयक संक्षिप्त पुस्तकें कधींच लोकप्रिय व्हावयाचीं नाहींत. इतिहासलेखकां-समोर गतकाळचें स्पष्ट चित्र उभें राहिल्याशिवाय, कार्यकारणांच्या नियमान्वयें उत्पन्न झालेल्या घडामोडी कोणत्या व केवळ सहजा-सहजीं उत्पन्न होऊन कालपटावर आपलें स्मृतिचिन्ह न ठेवणाऱ्या क्षुद्र गोष्टी कोणत्या याचा निवाडा त्यांस करतां येणार नाहीं."

तसेंच या कालांतील एकंदर वाङ्मयाबद्दल एकदां त्यांनीं काढ-लेले उद्गार ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. "अगदीं तिऱ्हाइताच्या दृष्टीनें पाहिल्यास आमचें वाङ्मय भ्रमपुष्ट व पोरकट भासल्या-शिवाय रहात नाहीं. ही दशा नाहींशी करण्यासाठीं कळकळीच्या प्रयत्नांमध्यें कित्येक शतकें घालवावीं लागतील. सध्यांच्या काळा-कडे पाहिल्यास तो आशेनें ओथंबलेला दिसतो, आणि थोड्याच अवधींत प्रगल्भावस्थेस पोंचलेल्या देशी भाषांत ही भाषा अग्रगण्य-त्वाचा मान पटकावील असा निश्चित संभव आहे" माधव-रावांचें हें आशावादी भविष्यकथन फळाला आल्याचीं चिन्हें त्यांच्या हयातींतच दिसूं लागून त्यांच्या जिवाला खासच समाधान वाटलें असेल.

## अक्कलकोट व कोल्हापूर

हें काम करीत असतांनाच मध्यंतरीच्या कांहीं काळांत माधव-रावांना इतर दोन कामानिमित्त स्थलांतर करावें लागलें होतें. १८६६ च्या जूनपासून १८६८ च्या एप्रीलपर्यंत अवघीं दोन वर्षें ते मराठी ट्रान्स्लेटरचें काम पहात असत. मध्यंतरीं १८६७मध्यें कांहीं दिवस अक्कलकोट येथें कारभारी म्हणून ते काम करीत होते. थोड्याच दिवसांनीं या कामाचीं सूत्रें सोडून कोल्हापूर येथें न्यायाधीश म्हणून

ते आले. वीस वर्षांपूर्वीं ज्या गांवात एक वेडपट, अर्धवट मुलगा म्हणून विद्यामंदिराची पहिली पाऊलवाट माधवराव आक्रमीत होते तेथेंच आतां ते एक बडे न्यायाधिकारी म्हणून आले होते. ज्या माधवाला दहा रुपयांची कमाई करून आपलें व आपल्या बायकोचें पोट तरी भरतां येईल कीं नाहीं अशी आईला शंका वाटत होती तेच माधवराव आतां त्याच गांवांत बड्या पगाराचे हुद्देदार म्हणून आले होते. आणि हें सारें केवळ स्वतःच्या कर्तबगारीच्या आणि हुशारीच्या जोरावर. माधवरावांचा स्वभाव अजूनहि पूर्वीसारखाच होता. तीच विद्यार्थीदशेंतील मर्यादशील वागणूक, तोच पूर्वीचा शांतगंभीर स्वभाव आणि तोच भिडस्तपणा. पण आतां त्यांचेकडे बघण्याची लोकांची दृष्टि मात्र निराळी होती. ह्यामुळें सर्वांनाच त्यांचेमधें एक प्रकारचा निगर्वी मोठेपणा आढळून येई. येथेंच न्यायाधिशाचें काम करीत असतां एक विचित्र प्रसंग त्यांचेवर आला होता. पण त्यांतूनाहि कोठल्याहि तऱ्हेच्या मर्यादा न सोडतां, व मोहालाहि बळी न पडतां त्यांनीं स्वतःला निभावून नेलें व स्वतःच्या चारित्र्याचा प्रभाव दाखविला.

## तो प्रसंग

त्यांचेपुढें एक खटला आला होता. त्या खटल्यांतील प्रतिवादी एका घरंदाज कुळांतील असून माधवरावांच्या वडिलांच्या ते चांगले परिचयाचे होते. त्यांनीं या खटल्याबद्दल माधवरावांना चार शब्द आपल्या वतीनें सांगण्याची गोविंदरावांना भीड घातली; व ‘ फुरसतीच्या वेळीं माझे सर्व कागद एकवेळ पाहून माझी सर्व हकीकत स्वस्थपणानें ऐकावी ’ अशाबद्दल गोविंदरावांच्या मागें त्यांनीं टुमणें लावलें. सरतेशेवटीं नाइलाज झाल्यामुळें गोविंदराव त्या गृहस्थांना माधवरावांकडे घेऊन आलेच. अर्थात् माधवरावांना ही गोष्ट पसंत

पडली नाहीं. पण वडिलांचा मान राखावयाचा म्हणून ते कांहींहि बोलले नाहींत. एक शब्दहि न बोलतां मोठ्या गंभीर चेहऱ्यानें ते आलेल्या पाहुण्यासमोर बसले. शेवटीं त्या पाहुण्यानेंच बोलावयास सुरवात केली, "मी कांहीं आज कागदपत्र आणले नाहींत, फुरसत असेल तर आणवितों."

तेव्हां शांतपणानें माधवरावांनीं उत्तर केलें, "आज मला लिहिण्याचें काम बरेंच आहे, फुरसतीचा वेळ असेल तो मी आपणांस कळवीन." असें त्यांनीं म्हणतांच आलेले गृहस्थ उठून नमस्कार करून निघून गेले.

पुढें माधवरावांनीं आदबीनेंच पण करारी आवाजांत वडिलांना सांगितलें, "सारें कोल्हापूर आपलेंच आहे—पण मी येथें जबाबदारीच्या कामावर आलों असल्यामुळें पुन्हा असा प्रकार न झालेला बरा." आपल्या मुलाच्या या वाक्यानें चरकलेल्या गोविंदरावांनीं पुन्हा असा प्रकार घडून येऊं दिला नाहीं.

आणि असा प्रसंग येण्याचें कारणच उरलें नाहीं. कारण या प्रसंगानंतर लगेंच चार महिन्यांनीं म्हणजे १८६८ च्या मार्च महिन्यांत एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें इंग्रजी व इतिहास या विषयांचे प्रोफेसर म्हणून माधवरावांची बदली झाली. या वेळीं माधवराव परत शिक्षणखात्यांत आलेले पाहून त्यांच्या कांहीं सहकाऱ्यांना व विद्यार्थ्यांना इतका आनंद झाला होता कीं, माधवराव येतांच आपसांत वर्गणी करून त्यांनीं एका सोन्याच्या घड्याळानिशीं त्यांचें स्वागत केलें. पण याच प्रोफेसरीच्या जागेवर माधवराव कायम असे फार दिवस राहिलेच नाहींत. अधूनमधून न्यायखात्यांतील कांहीं जागांवर त्यांची हंगामी नेमणूक होई, तर तशी जागा रिकामी नसली कीं परत ते प्रोफेसरीच्या जागेवर येत असत. १८७१ मध्यें ते ॲडव्होकेटची परीक्षा

उत्तीर्ण झाले व लगेंच त्यांना पुढें येथें सदरअमीन ( फर्स्टक्लास सब्-जज्ज ) या जागेवर आठशें रुपये पगारावर नेमण्यांत आलें व अशा रीतीनें त्यांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या अशा कार्यास सुरवात झाली.

## सार्वजनिक कार्याचा ओनामा

सरकारी नोकर आणि न्यायमूर्ती म्हणून माधवरावांचें नांव सर्वतोमुखीं झालेलें असलें, तरी त्यांचे नांवाला त्यांनीं केलेल्या सामाजिक चळवळीमुळें आलेलें महत्त्व सुतराम् अधिक होतें यांत शंका नाहीं. आणि विद्यार्थीदशेच्या काळांतच आपल्या प्रचंड ज्ञानयज्ञाबरोबर त्यांनीं सामाजिक आणि इतर सार्वजनिक कार्याकडेहि लक्ष द्यावयास सुरवात केली होती. फार कशाला, कॉलेज-प्रवेशाबरोबरच सामाजिक बाबतींत ते लक्ष घालूं लागले होते !

ज्या संस्थेमार्फत माधवरावजींनीं सार्वजनिक कार्यांत अगदीं विद्यार्थीदशेंतच पाऊल टाकलें ती म्हणजे 'ज्ञानप्रसारक' सभा ही होय. इ. स. १८४८ च्या सुमारासच ही सभा मुंबईच्या कांहीं लोकांनीं स्थापिली होती. मराठी भाषेचे पहिले व्याकरणकार दादोबा पांडुरंग हे त्या सभेचे अध्यक्ष होते. सुरवातीस एकदोन वर्षें कार्य केल्यावर ही सभा बंद पडण्याचे बेतांत आली होती. पण माधवराव ज्या वेळेस मुम्बईस आले त्याच वेळीं मुम्बईचे तत्कालीन प्रसिद्ध लोक डॉ. भाऊ दाजी, रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलीक, गोविंद नारायण माडगांवकर यांनीं या संस्थेला परत नांवारूपाला आणण्याचा प्रयत्न केला. याच संस्थेंत कीर्तने, बाळ मंगेश वागळे, महादेव मोरेश्वर कुंटे, वामन आबाजी मोडक इत्यादि आपल्या मित्रमंडळींसमवेत येऊन माधवरावहि सार्वजनिक कार्याचे आपले

पहिले धडे १८५८ पासूनच गिरवूं लागले. एकाद्या लोकोपयोगी अगर ज्ञानवर्धक विषयावर चर्चा करून वा निबंध लिहून त्या विषयाला चालना देण्याचें काम ही मंडळी करीत. या सभेमार्फत कित्येक दिवस एक मासिकहि चालविलें जात असे.

## तीन निबंध

माधवरावहि दरवर्षी एकाद्या विषयावर या सभेंत आपला निबंध वाचीत. 'तरुण शिकलेल्या लोकांचीं कर्तव्यें' 'मराठी राजे-रजवाडे' 'मराठी व बंगाली लोकांच्या भावी उत्कर्षाची तुलना' व 'प्रजावृद्धीचे दुष्परिणाम' हे चार निबंध १८५९ ते १८६४ चे दरम्यान दरवर्षास एक याप्रमाणें माधवरावांनीं वाचले होते. १८६१ मधें कदाचित् ते आपल्या बी. ए. च्या परीक्षेची तयारी करीत होते म्हणून त्यांनीं निबंध वाचला नसावा. या सर्व निबंधांत माधवरावांची अभ्यासू वृत्ति, आपल्या देशाच्या सर्वांगीण उन्नतीची कळकळ आणि इंग्रजी राज्यामुळें नव्या नव्या उत्पन्न होणाऱ्या प्रश्नांकडे अगदीं नव्या दृष्टीनें बघण्याची पद्धत चांगलीच दिसून येते.

## सुधारणांची पहिली पाऊलवाट

इंग्रजी राज्याबरोबर कांहीं कांहीं नवीनच गोष्टी आपल्याकडे येऊन रूढ होऊं पहात होत्या. सार्वजनिक शिक्षण सुरू होऊन ते इंग्रजींतूनच दिलें जाऊं लागल्यानें साऱ्या जगांत काय चाललें आहे हें आपल्याकडील विद्वानांनाच कां होईना पण कळूं लागलें. होतें. त्यामुळें आपल्या देशाची सुधारणा कोणत्या दृष्टीनें करावयास हवी याची त्यांना अगदीं नवीनच दृष्टि येऊं लागली इ. स. १८४९ मधें 'ज्ञानप्रकाश' पत्र निघालें. 'प्रभाकर,' 'धूमकेतू' इत्यादि आणखीहि कांहीं वर्तमानपत्रें निघालीं होतीं. या वर्तमानपत्रांतून

समाजांतील दुःखांना तोंड फुटून तीं वेशीवर टांगलीं जाऊं लागलीं. 'प्रभाकर' पत्रांतूनच लोकहितवादींनीं ब्राह्मण्यावर व जातिभेदावर प्रचंड हत्यार धरलें. १८५९ चे सुमारास आगगाड्या सुरू झाल्या. या नव्या वाहनाच्या सोयीनें 'सब घोडे बारा टक्के' या न्यायानें या सर्व जातींचे लोक एकाच वर्गानें प्रवास करूं लागले. त्यामुळें जातिभेदावर चांगलाच टोला बसला. या सर्व बदलांकडे मोठ्या जागरूकतेनें माधवराव लक्ष देत होतेच; पण १८५६ सालीं झालेल्या विधवाविवाहाच्या कायद्यानें जी एक प्रचंड चळवळ सुरू झाली तिच्यांत त्यांचेकडे एक महत्त्वाचा भाग आल्यामुळें सामाजिक कार्यात त्यांचें पाऊल झपाट्यानें पुढें पडलें. हा कायदा पास होतांच मुंबईच्या लोकांनीं प्रचंड पाठिंबा दिला. देशांतील सनातन्यांचा प्रचंड विरोध होणार हें उघड होतें. हा कायदा पास होतांच सरसहा विधवाविवाह सुरू झाले नाहींत; आणि जो एकादुसरा विवाह घडून येई त्या वधूवरांवर समाजाचा बहिष्कार पडे. इंग्रजी सरकारचे राज्यापूर्वी सामाजिक आणि धार्मिक बाबींतील तक्रारी वा फिर्यादी शंकराचार्यांचेकडे जात. पण इंग्रजी कायद्याचें बलशालित्व प्रस्थापित झाल्यावर जनता या शंकराचार्यांचे शिक्षांचा वा आज्ञापत्रांचा धिक्कार करूं लागली, व हळूहळू त्यांना कोणीहि विचारीनासा झाला. फार तर कांहीं थोडे सनातनी अपराधी माणसांवर ग्रामण्य पाडूं लागले.

## इन्दुप्रकाश

इ. स. १८६२ सालीं 'इंदुप्रकाश' हें वृत्तपत्र निघालें. सुरवातीपासून कांहीं दिवस माधवराव या वृत्तपत्राच्या इंग्रजी विभागाचे संपादक होते. पुढें आपल्या इतर व्यवसायामुळें जरी फार दिवस त्यांना या वृत्तपत्राचें संपादकीय काम करतां आलें नाहीं, तरी

त्यांचे जिव्हाळ्याचे मित्रच तेथें असल्यामुळें ‘ इंदुप्रकाश ’ त्यांच्याच मतानुसार निघत असे असें म्हणणें धाष्टर्याचें होणार नाहीं.

## विष्णुशास्त्री पंडित

याच वेळीं एक कट्टे समाजसुधारक माधवरावांचे सान्निध्यांत आले. यांचें नांव विष्णुशास्त्री पंडित. जुन्या शास्त्रविद्येंत ते पारंगत असून इंग्रजी भाषेचाहि त्यांनीं खोल अभ्यास केला होता. पहिले कांहीं दिवस ते सरकारी नोकरींत होते. पण हीं बंधनें तोडून त्यांनीं आपलें जीवित समाजकार्याला वाहून घेतलें. त्यांनीं इंदुप्रकाशमध्यें विधवा-विवाहास अनुकूल अशा



लेखांचा धडाका उडवला. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं बंगालींत या विषयावर लिहिलेल्या एका पुस्तकाचा अनुवाद केला व अशा तऱ्हेनें मोठ्या हिरहिरीनें त्यांनीं या नव्या कार्याचा प्रचार सुरू केला.

## पुनर्विवाहाची चळवळ

लगेंच माधवराव, विष्णुशास्त्री पंडित या लोकांनीं ‘ विधवाविवाहोत्तेजक ’ संस्था काढून प्रत्यक्ष कार्याला हात घालण्याची तयारी सुरू केली. सुरवातीसच या संस्थेला

मोठमोठ्या लोकांचें पाठबळ मिळूं लागलें. जमखिंडीचे त्या वेळचे अधिपति हे या संस्थेचे अध्यक्ष झाले होते. तर सरदार माधवराव विंचूरकर हे उपाध्यक्ष झाले होते. अशा तऱ्हेनें स. १८६५ पर्यंत विष्णुशास्त्री पंडितांनीं केवळ आपल्या चिकाटीच्या चळवळींनीं विधवाविवाहाच्या कल्पनेला व्यवस्थित स्वरूप देऊन प्रचार सुरू केला. अर्थात् सनातनी लोक कांहीं स्वस्थ नव्हते. त्यांनींहि 'हिंदु-धर्मव्यवस्थापक सभा' नांवाची एक सभा काढून तिचेमार्फत पुढें होणाऱ्या भयंकर लढ्याची तयारी सुरू केली. त्यांचें पहिलें कार्य म्हणजे शंकराचार्यांचा धांवा. जे धर्मनष्ट चांडाळ असल्या अभद्र प्रथा आणूं पहात होते, त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं त्यांनीं शंकराचार्यांची मदत घेण्याचें ठरविलें.त्याबरोबरच पुनर्विवाह पक्षाला त्यांनीं शास्त्राधारें आपला पक्ष न्याय्य आहे हें सिद्ध करण्याचें आव्हान दिलें. पण अशा आव्हानाची विष्णुशास्त्र्यांसारख्या जातिवंत पंडिताला काय डर वाटणार ? असें आव्हान नुसतें जाहीर होतांच त्यांनीं अनेक शास्त्राधार दाखवून आपल्या प्रतिपक्षाला वाग्युद्धांत चीत करण्याचा प्रसंग आणला. शिवाय विष्णुशास्त्री पंडित नुसती तोंडातोंडी करून वादाडीत बसले नव्हते तर एक पुनर्विवाह आपल्या 'इन्दुप्रकाशांत' जाहीर करून आपल्या कार्याची त्यांनीं ध्वजा फडकाविली होती. लोकहितवादी गोपाळराव देशमुख, विष्णुशास्त्री पंडित,माधवराव रानडे इत्यादि सात बड्या लोकांच्या सहीनिशीं या पुनर्विवाहाची आमंत्रणपत्रिका निघून ती घरोघर जाऊं लागली. या प्रत्यक्ष कृतीनें विरोधी पक्षाचें धाबेंच दणाणलें. काय वाटेल तें होवो, पण हा पुनर्विवाह थांबवा असें आग्रहानें ते म्हणूं लागले. 'अगोदर शास्त्राधार दाखवा व मगच या गोष्टीस सिद्ध व्हा' असें त्यांनीं विष्णुशास्त्री पंडितांना आव्हान दिलें. यासाठीं त्यांनीं एक सभादेखील बोलावली. सभेमध्यें आपण गेलों नाहीं तर उगीचच

' आपला जय झाला ' असा विरोधीपक्ष कलकलाट करील म्हणून प्रचंड विरोध दिसत असतांहि माधवराव, बाळ मंगेश वागळे इत्यादि लोक मुद्दाम सभेस गेले. पण अशा चिडखोर सनातन्यांच्या सभेंत चर्चा होणारच नव्हती. अगदीं सुरवातीपासूनच धक्काबुक्कीचे प्रसंग सुरु झाले. व अखेर या गोष्टीचें पर्यवसान सभा मोडण्यांत झालें. तरीपण विष्णुशास्त्री पंडितांच्या पक्षाचा निश्चय कायम होता. प्रसंगीं आपणांस सनातनी गुंडांकडून मारहाण होईल अशीहि त्यांना भीति वाटत होती. पण ऐन वेळीं एक साह्यकर्ता त्याचे मदतीसाठीं धावून आला. तो मुंबईतील एका प्रसिद्ध आखाड्याचा वस्ताद होता व त्याला पंडितांची बाजू न्याय्य आहे असें वाटत होतें. त्यानें आपल्या हस्तकांचे बळावर सनातनी गुंडांना धाकदपटशा दाखवून शांत केलें. आणि अशा आणीबाणीच्या प्रसंगांनीं भरलेला हा पुनर्विवाह* १५ जून १८६९ रोजीं मोठ्या थाटानें घडून येऊन पुनर्विवाह पक्षाचा मोठाच जय झाला.

सदर विवाह घडून आला हा आपला फारच मोठा अपमान झाला असें पूर्वोक्त हिंदुधर्मव्यवस्थापक सभेच्या लोकांना वाटूं लागलें. पण स्वतःचे हात चावण्यावलीकडे आतां त्यांचे हातांत कांहीं नव्हतें. ते नुसते मनांतल्या मनांत जळत होते. त्यांनीं पुन्हा एकदां शंकराचार्यांची कास धरून त्यांचेकडून सदरील पुनर्विवाहामधील आमंत्रक, म्हणजे विष्णुशास्त्री पंडित, माधवराव, गोपाळराव देशमुख, तळेकर, गाडगीळ, विष्णु मोरेश्वर भिडे व विष्णु परशुराम रानडे

* " मुंबईस मोगेबा कान्होबा याचे वाड्यांत प्रभाकरभट परांजपे याची कन्या वेणूबाई हिचा मोठ्या थाटानें पुनर्विवाह झाला. नियोजित वर पांडुरंग विनायक करमरकर हे होते. "—गं. ब. सरदारकृत महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी, पृ. १७५.

हे सात लोक, वधूवर, व वधूचे दोन भाऊ अशा अकरा जणांना जातिबहिष्कृत केल्याचा फतवा काढविला. मुंबई, पुणें येथील सनातनी मंडळींनीं शंकराचार्यांच्या या बहिष्कारपत्राचें स्वागत करून या लोकांना जातिबाहेर टाकल्याचें जाहीर केलें. विष्णुशास्त्री पंडित कांहीं स्वस्थ बसले नव्हते. गांवोगांवीं त्यांनीं पुढील आशयाचें पत्रक लावण्याची व्यवस्था केली. "हा बहिष्कार निरर्थक आहे, विधवाविवाह शास्त्रसंमतच आहे, तेव्हां अशा विधवाविवाहाच्या पुरस्कर्त्यांवर उगीच बहिष्कार टाकणें निरर्थक व सारासार विचारास सोडून आहे. तसेंच ज्या कोणाला विधवाविवाहाची सशास्त्रता पटत नसेल त्यांचेशीं वाद करावयाला विष्णुशास्त्री पंडित तयार आहेत." या पत्रकांचा सनातन्यांवर परिणाम होऊन विष्णुशास्त्र्यांशीं वाद करण्याचा प्रसंग आलाच, तर कोणते मुद्दे पुढें आणावेत याबद्दल त्यांचेमध्यें चर्चा सुरू झाली. वास्तविक या सर्व प्रकरणांत विष्णुशास्त्री पंडित हेच प्रामुख्यानें चमकत असले तरी त्यांचे पाठीशीं माधवरावांची धीरोदात्त मूर्ति सदैव उभी होती. आणि यामुळें या प्रकरणीं विष्णुशास्त्री पंडितांइतकेंच माधवराव यांचेंहि महत्त्व आहे.

मध्यंतरींच्या काळांत माधवराव व त्यांचे इतर सहकारी हे गांवोगांव हिंडून आपल्या मताचा प्रचार करीतच होते. पण या प्रचाराचा फारसा उपयोग झाला नसावा.

## पुण्यांतील प्रसिद्ध वाद

सरतेशेवटीं स. १८७० मध्यें श्रीमत् शंकराचार्यांची स्वारी पुणें मुक्कामीं असतां त्यांचेपुढें या वादाला तोंड फुटलें व चांगलाच रंग चढला. मार्च १८७० मध्यें झालेला हा वाद अनेक दृष्टींनीं संस्मरणीय असाच आहे.

पुनर्विवाह शास्त्रसंमत आहे या मताचे अध्वर्यु अर्थात् विष्णुशास्त्री पंडित हेच होते. तर विरुद्ध पक्षाचे अध्वर्यु नारायणाचार्य गजेंद्रगडकर हे होते. नामांकित शास्त्री लोकांची दोन्ही बाजूंचे पंच म्हणून नेमणूक केली होती. या काळांतील एक अव्वल दर्जाचे पंडित कृष्णशास्त्री चिपळोणकर (कीं ज्यांना त्यांनीं युरोपियनांबरोबर खाल्लेल्या फळांबद्दल प्रथम प्रायश्चित्त देण्यांत आलें होतें) हे सनातनी पक्षातर्फे एक पंच होते. माधवराव, डॉ. भांडारकर वगैरे मंडळी विष्णुशास्त्री पंडितांस मदत करीत होती. तर गजेंद्रगडकरांनाहि त्यांचे बाजूचे अनेक विद्वान मदत करीत होते; अशा तयारीनें शंकराचार्यांचे समोर वादाला सुरवात झाली. हा वाद सुमारें नऊ दिवस टिकला. वास्तविक व्यवस्थित रीतीनें वाद चालवून जो काय निकाल होतो तो पाहण्याचें प्रत्येक बाजूचें कर्तव्य होतें. पण सनातनी पक्षापैकीं कांहीं गुंडांनीं वाद चालू असतांनाच पंचांमधें अनेक प्रकारांनीं फूट पाडण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या प्रयत्नाला यश येऊन एक पंच फुटला व त्यानें अखेर विरुद्ध मत दिल्यानें वादाचा निकाल सनातन्यांचे बाजूनें झाला. अर्थात् या सर्व भानगडी पुढें बाहेर आल्या व प्रकरण कोर्टापर्यंत गेलें. तरीपण तावत्काल कां होईना सनातनी पक्षाचा जय झाला होता हें खरें. अशा या निकालानें पुनर्विवाहाच्या बाजूच्या बऱ्याच लोकांनीं घाबरून श्रींना शरण जाऊन, स्वतःला पावन करून घेतलें. अर्थात् पूर्वोक्त अकरा लोकांचेवरचा बहिष्कार यामुळें अधिक कडक झाला असणें साहजिकच होतें. या बहिष्काराचें वर्णन माधवरावांनीं एका इंग्रज मित्राला लिहिलेल्या पत्रांत उत्तम प्रकारें केलें आहे. "माझी धाकटी (विधवा) बहीण मजजवळ मुंबईस रहात असे. तिच्या सासरच्या मंडळींनीं तिला बोलावून नेलें व पुष्कळ दिवसपर्यंत तिची व

माझी गांठ पडूं दिली नाहीं. माझ्या ब्राह्मण नोकरांनीं मला सोडलें. नवे नोकरहि थोड्याच दिवसांत बहिष्काराच्या भीतीनें मला सोडून जात. आमच्या घरांतल्या बायका कोठें गेल्या कीं त्यांचा अपमान होऊं लागला....कुटुंबांतलें कोणी वारल्यास त्याच्या प्रेतसंस्कारास लोक मिळण्याची पंचाईत पडूं लागली. माझे वृद्ध वडील मजजवळ येऊन राहूं लागल्यावर, माझ्यामुळें त्यांचेवर छळाची घोरपड येऊं नये म्हणून मी त्यांचे पंक्तीलासुद्धां बसत नसे. ''

## विहिणीचा सवाल

लोकहितवादी गोपाळराव देशमुखांची तर याहूनहि जास्त पंचाईत झाली. त्यांची मुलगी एका सनातनी कुटुंबांत दिली होती. "प्रायश्चित्त घेऊन पावन व्हा नाहींतर आपल्या लकीला टाकून देऊन मी मुलाचें दुसरें लग्न करेन'' असा खडखडीत सवाल त्यांच्या विहिणीनें त्यांना टाकला. आपल्यामुळें आपल्या पोटच्या अपत्याचा घात होतो आहे हें पहातांच गोपाळरावांना मनस्वी वाईट वाटलें व तत्काळ त्यांनीं प्रायश्चित्त घेऊन टाकलें. तरीपण याचा अर्थ



पुनर्विवाह पक्ष घेतल्याबद्दल त्यांना ख़रेंखुरें वाईट वाटलें असा नव्हता, व त्यांच्यावर जेव्हां प्रायश्चित्ताबद्दल टीका होऊं लागली

तेव्हां तर त्यांनीं तसें स्पष्ट जाहीरहि करून टाकलें. गोपाळरावांच्या उदाहरणानें आणखीहि कांहींजणांनीं प्रायश्चित्त घेऊन ते मोकळे झाले. राहतां राहिले फक्त तिघेजणच, कीं ज्यांनीं या वेळीं प्रायश्चित्ताच्या कल्पनेला भीक घातली नाहीं. ते तिघे म्हणजे विष्णु परशुराम रानडे, माधवराव रानडे आणि खुद्द विष्णुशास्त्री पंडित. यांना मात्र प्रायश्चित्ताचा खूपच त्रास सोसावा लागला. तो कशा प्रकारचा असेल याची थोडीतरी कल्पना माधवरावांच्या वर दिलेल्या पत्रावरून आपणांस येईल. परंतु यांपैकीं विष्णु परशुराम रानडे पुढें लवकरच निवर्तले व माधवरावांच्या एकंदर सौजन्याच्या वागणुकीनें त्यांचे वरील बहिष्कार हळूहळू कमी झाला असें म्हणावयास हरकत नाहीं. खुद्द विष्णुशास्त्री पंडितांनीं मात्र या असल्या बहिष्काराची कधींच तमा धरिली नाहीं. येवढेंच नव्हे तर या बहिष्काराला सक्रिय उत्तर देण्याचे बुद्धीनेंच जणूं इ. स. १८७४ त स्वतःच एका गतभर्तृकेशीं लग्न लाविलें.

## प्रार्थनासमाज

पुनर्विवाहाची ही वावटळ चालू असतांच मुंबईस इ. स. १८६७ च्या मार्चमधें प्रार्थनासमाज स्थापन झाला. या स्थापनेच्या वेळीं या कार्यांत माधवरावांचें प्रमुख अंग असावे असें आढळून येत नसलें, तरी प्रार्थनासमाजाचे ते एक मोठे आधारस्तंभ होते आणि त्यांनीं यावत्जीव प्रार्थनासमाजाच्या उन्नतीसाठीं कष्ट उपसले होते ही गोष्ट खोटी नाहीं. प्रार्थनासमाज काढण्यांत एकादा नवीन धर्मपंथ काढण्याची बिलकुल कल्पना नव्हती. उलट, हा समाज हें एक स्वदेशबांधवांच्या धार्मिक उद्धाराचें साधन व्हावें अशीच समाजांतील माधवरावांसारख्या जबाबदार माणसांची कल्पना होती. " परमेश्वर एक आहे, अद्वितीय आहे, तोच जगाचा नियंता व

पालनकर्ता असून त्याचें स्वरूप अनंत, अतर्क्य, शाश्वत, निराकार, सर्वसाक्षी, सर्वशक्तिसंपन्न, दयाघन, पवित्र व पापनाशक आहे. त्याला शरण गेल्यानें इहपरलोकीं सुख मिळतें. त्याच्याविषयीं प्रेमादर बाळगणें, त्याचें गुणवर्णन करणें,त्याला आवडणारी सत्क्रिया आचरणें हीच त्याची खरी पूजा होय. मूर्तीची किंवा अन्य सृष्ट पदार्थांची पूजा केल्यानें ती परमेश्वराला पोंचत नाहीं. परमेश्वर कधींहि अवतार धारण करीत नाहीं. व त्यानें कोणताहि धर्मग्रंथ निर्माण केला नाहीं. सर्व माणसें ईश्वराचीं लेकरें असून आपसांत बंधुभावानें वागणें हें प्रत्येक मनुष्यमात्राचें कर्तव्य आहे. परमेश्वर या कर्तव्यानेंच प्रसन्न होतो." हीं प्रार्थनासमाजाचीं मूलतत्त्वें आहेत. या समाजाचे कार्यासाठीं माधवरावांचा बराच वेळ जात असे. पण मध्यंतरीं उठलेल्या पुनर्विवाह वावटळीमध्यें या समाजाच्या कार्याला गौणत्व आलें होतें येवढेंच.

## उगवता सूर्य

मुंबई येथें असतांना माधवरावांनीं केलेल्या सामाजिक आणि सार्वजनिक चळवळीचें स्वरूप अशाप्रकारचें होतें. विद्यालयीन शिक्षणांत प्रत्येक परिक्षेंत ज्याप्रमाणें ते चमकून जाऊन लोकांच्या डोळ्यांत भरले जात असत, त्याप्रमाणें त्यांच्या या सुरवातीच्या सार्वजनिक कार्याच्या पसाऱ्यांतहि आपल्या बुद्धिवैभवानें ते आपली छाप लोकांवर टाकल्याशिवाय रहात नसत. आणि यामुळें थोडक्याच दिवसांत महाराष्ट्रांतील या उगवत्या सूर्याच्या प्रभेनें जो तो दिपून जाऊं लागला.

## पुणें येथें बदली

आणि अशा परिस्थितींत इ. स. १८७१ सालीं त्यांची मुंबईहून पुणें येथें सदर अमीनच्या जागेवर बदली करण्यांत

आली. नवीन आलेल्या इंग्रजी राज्याची राजधानी म्हणून मुंबईची या वेळीं प्रसिद्धि होऊं लागली होती तर नुकत्याच अस्तंगत झालेल्या पेशवाईची राजधानी म्हणून पुण्याची प्रसिद्धि होती. त्यामुळें एका राजधानींतला ख्यातनाम माणूस दुसऱ्या राजधानींत येतांक्षणींच त्याचेबद्दल लोकांत कुतूहल उत्पन्न झालें असेलच कीं नाहीं ? शिवाय राज्य बदलून नवी राजधानी म्हणून मुंबईला महत्त्व आलें होतें,तरी गेलेल्या स्वराज्याची बौद्धिक राजधानी म्हणून अजूनहि पुणें शहरालाच महत्त्व होतें. व तेथील लोकांनीं या नव्या येणाऱ्या बुद्धिमान पुढाऱ्याचें मोल ओळखलें होतें. म्हणूनच माधवरावांची पुण्यास बदली झाली ही येथील लोकांना फार महत्त्वाची गोष्ट वाटत होती. नाहींतर माधवरावांचें आधीं काय कमी मुंबईचे लोक पुण्यास बदलून आले होते ? माधवरावांनींहि पण पुण्यास येतांच नव्या दमानें आणि उत्साहानें देशसेवेच्या निरनिराळ्या प्रांगणांत संचार करण्यास सुरवात केली. येवढेंच नव्हे तर आपलेभोंवतीं चांगला लोकसंग्रह करून, एकसमयावच्छेदेंकरून निरनिराळ्या दिशेनें कार्य करण्याचा धडाका सुरू केला. याबद्दल सविस्तर माहिती करून घेण्याचे अगोदर माधवराव पुणें येथें आले त्या वेळीं पुण्याची–पर्यायानें साऱ्या महाराष्ट्राची वा अस्तंगत मराठी राज्याची–काय स्थिति होती ही लोकमान्यांच्याच शब्दांत आपण पाहूं.

### थंड गोळा

" एक राज्य जाऊन दुसरें कायम होईपर्यंत मध्यंतरीं जो काळ जातो तो राष्ट्राच्या अभिवृद्धीस पुष्कळ प्रकारें प्रतिबंधक असतो, हें ऐतिहासिक तत्त्व सुप्रसिद्ध आहे. सन १८२० पासून १८७० पर्यंत महाराष्ट्र देशाची स्थिति अशीच होती. ज्या पुणें शहरांत नाना-

फडणविसासारख्या मुत्सद्यांना कांहीं वर्षे वास्तव्य करून मराठी राज्याचा गाडा हाकला व जेथें पेशवाईची अखेर होईपर्यंत मुत्सद्दी व शूर पुरुषांची परंपरा कायम होती तेथें एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत सर्व बाबतींत बहुतेक प्रेतकळा आली होती, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. ज्या सरदार घराण्यांतील पुरुषांनी पेशवाईत मोठमोठीं कामें केलीं होतीं, त्यांच्या वंशजांस इंग्रज सरकारनें पेन्शन देऊन स्वस्थ बसण्यास सांगितलें असल्या-मुळें, नवीन राज्यव्यवस्थेच्या बरेवाईटपणाबद्दल विचार करण्याचे त्यांचे कुलव्रत त्यांनीं सोडून दिल्यासारखेंच होतें. देशाचे पुढारीच असे कर्तव्यपराङ्मुख झाल्यावर गरीब रयतेची स्थिति कशी झाली असेल हें सांगावयास नकोच! टोपीवाल्याची राज्य करण्याची शिस्तवार रीत, चोहोंकडे त्यांनीं घालून दिलेलीं कायद्याचीं बंधनें, जमीन-पहाणी, आगगाड्या, तारायंत्रें, शाळा, पोस्ट ऑफिसें, वगैरे राज्यव्यवस्थेच्या अपूर्व थाटानें लोक दिपून गेल्यासारखे झाले होते. त्यांतून बंडवाल्यांचा पराभव झाल्यानंतर तर इंग्रजी राज्याची अधिकच छाप बसली गेली. जुन्या सरदार घराण्यांतील पुरुषांस राजकारणांत पडण्याची जरूरी नसल्यामुळें त्यांच्या अंगचे गुण लुप्तप्राय झाले व पुणें पाठशाळेंतून तयार झालेले नवीन विद्वान सरकारी नोकरींत आणि त्यामुळें प्राप्त होणाऱ्या मानांतच दंग होऊन राहिले. जी स्थिति पुण्याची तीच सगळ्या महाराष्ट्राची स्थिति होती.........या व अनेक कारणांमुळें राष्ट्रांतील चळवळ अगदीं बंद पडून गेली होती व कोणास आपण पुढें काय करावें हें सुचत नसून हल्लींची स्थिति बरी किंवा वाईट हेंहि कळत नव्हतें. ज्या प्रांतांतील लोकांनीं एकदां मराठी राज्याचा गाडा हांकला होता, त्यांतील पुढाऱ्यांच्या वंशजांची दोनच पिढ्यांत अशी स्थिति व्हावी ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट होय......(अशा परिस्थितींत)

कोणत्याही प्रकारची चळवळ करण्याविषयीं पराङ्मुखता आणि केवळ स्वांहितपरायणतेमुळें, अथवा पूर्वींच्या अमदानींत ज्या गुणांची चहा होत होती तेच गुण नेटिव्हांच्या अंगीं असण्याची आवश्यकता न राहिल्यामुळें, लोकांच्या पुढाऱ्यांच्या अंगीं आलेलें एक प्रकारचें शैथिल्य हेंच काय तें सर्व देशभर नजरेस येत होतें. लोकांच्या अंगचें तेज अगदींच नाहींसें झालेलें होतें असें नाहीं, पण वर लिहिलेल्या कारणांमुळें महाराष्ट्र देश म्हणजे त्या वेळीं एक थंड गोळा होऊन पडला होता. ''

## ऊब येऊं लागली

अशा परिस्थितींत पुण्याला येतांच थोडक्याच दिवसांत माधवरावांनीं आपल्या सव्यसाचित्वानें अनेक मार्गांनीं लोकजागृतीचा असा कांहीं धडाका उडवून दिला कीं, थोडक्याच दिवसांत वर वर्णिलेल्या थंड गोळ्यांत ऊब आली, येवढेंच नव्हे तर जें पुणें यापूर्वी अगदीं मृतवत् वाटत होतें, त्या पुण्यांत सार्वजनिक चळवळींचें आणि राजकारणाचें जें चैतन्य निर्माण केलें गेलें, त्यामुळें दहापंधरा वर्षांच्या अवधींत पुनः पुणें हीं मुंबई इलाख्याची बौद्धिक व राजकीय राजधानी बनली असें सर्व हिंदुस्थानभर मानण्यांत येऊं लागलें. याचा प्रत्ययच पहावयाचा असेल, तर जेव्हां सन १८८५ मध्यें कॉंग्रेसची स्थापना झाली —कीं ज्या स्थापनेच्या कार्यामध्यें खुद्द माधवरावांचें बरेंच अंग होतें - त्या कॉंग्रेसचें पहिलें अधिवेशन पुणें येथेंच भरविण्याचें ठरलें होतें, येवढेंच नव्हे तर पुढें कदाचित् दरवर्षींहि येथेंच तें भरविलें जावें अशीहि कांहीं जणांची कल्पना होती. अर्थात् या गोष्टीचें सारें श्रेय माधवरावजींनाच होतें हें सांगावयास नकोच.

## सार्वजनिक सभा

माधवरावजी पुण्यास येण्याचे आधलेच वर्षी पुण्यास एक संस्था स्थापन झाली होती. ती म्हणजे सार्वजनिक सभा ही होय. ही सार्वजनिक सभा श्री. गणेश वासुदेव जोशी उर्फ सार्वजनिक काका यांनीं स्थापन केली. वास्तविक सार्वजनिक काका हे पुण्यांतील नाझर कचेरींतील एक साधे कारकून. त्यांचेवर कांहीं खोटेंच बालंट आलें व त्यांत त्यांची नौकरी गेली. आपल्यावर आलेल्या




खोटया बालंटानें चिडून जाऊन स्वारीनें कायद्याचाच अभ्यास सुरू केला व १८६५ मध्यें वकीलीची परीक्षा दिली. या काळांत त्यांचेवरचा डाग धुऊन निघाल्यानें त्यांना परत नोकरीवर बोलावण्यांत आलें. पण नोकरीची शृंखला अडकावून न घेतां यापुढें स्वतंत्रच राहून वकिली व देशसेवा करण्याचें त्यांनीं ठरवलें. सन १८७० त कांहीं सरदार. कांहीं संस्थानिक व कांहीं बडे लोक यांच्या मदतीनें त्यांनीं ही सार्वजनिक सभा स्थापिली. पर्वती-संस्थानच्या व्यवहारांत बराच गोंधळ त्या वेळीं माजून राहिला होता. त्या संस्थानची नीट व्यवस्था लागावी एवढाच संकुचित हेतु मनांत धरून ही संस्था स्थापन करण्यांत आली होती. पण गंगोत्रीसारख्या

जागेंतून उगम पावलेल्या गंगेला देखील मार्ग दाखविणारा भगीरथ असल्यामुळें ज्याप्रमाणें तिला पुढें विराट स्वरूप प्राप्त झालें; त्याच-प्रमाणें या संकुचित हेतूनें निघालेल्या सार्वजनिक सभेला मार्गदर्शन करणारा माधवरावासारखा भगीरथ मिळाला म्हणून थोडक्याच दिवसांत तिला किती विराट स्वरूप प्राप्त झालें हेंच आतां आपणांला पहावयाचें आहे. माधवराव पुण्याला येऊन दाखल होतांच लगेंच त्यांची मालवणास बदली होण्याचा योग आला होता. यदृच्छया तो योग घडून आला नाहीं हें खरें. पण तसें जर दैवदुर्विलासानें झालें असतें तर कदाचित् सार्वजनिक सभेचाच काय पण महाराष्ट्राचाहि राजकीय इतिहास निराळाच लिहावा लागला असता.

## बुद्धि आणि कर्तृत्व यांची सांगड

तेव्हां अशा तऱ्हेनें स. १८७१ चे अखेरीस पुणें येथें येतांच माधवरावांच्या नजरेस ' सार्वजनिक सभा ' ही एकच संस्था त्यांचे डोळ्यांपुढें आली. त्या संस्थेच्या नांवाशीं बऱ्याच वडया लोकांचीं नांवें निगडित झालेलीं माधवरावांना दिसलीं होतीं. पण या बडया लोकांचा खरोखरी सार्वजनिक कार्यांत कवडीचाहि उपयोग नसतो हें माधवराव जाणून होते. पण सार्वजनिक काकांच्या कार्यनिष्ठेची चुणूक पुण्यास येतांक्षणींच माधवरावांचे नजरेंत भरली असावी. कारण आल्या घटकेपासून माधवरावांनीं त्यांनाच हाताशीं धरून कार्यास सुरवात केली. वास्तविक सार्वजनिक काका या वेळीं चाळीस वर्षांचे व माधवरावजी त्यांचेपेक्षां दहा वर्षांनीं लहान. तथापि या दोघांची सांगड इतकी छान जमून आली कीं, जवळ जवळ दहा वर्षांच्या कालांत बुद्धिमत्तेचें कार्य माधवरावांनीं करावें व प्रत्यक्ष कर्तृत्वाचें कार्य काकांनीं उचलावें, असा त्यांचा जणूं शिरस्ताच ठरून गेला होता.

## स्वदेशीचें व्रत

पुण्यास येतांक्षणींच अगदीं सुरवातीस माधवरावांनीं स्वदेशी प्रचाराचें कार्य हातीं घेतलें व त्या निमित्तानें दोनतीन वर्षें अर्थशास्त्राच्या सखोल अभ्यासाचें भांडार त्यांनीं पुणेकरांपुढें खुलें करून दिलें. स्वदेशीची चळवळ अगदीं अलीकडील आहे, विशेषतः ती बंगालच्या फाळणीपासून निघाली अशी कांहीं लोकांची समजूत असते. पण त्यांनीं हें पक्कें समजावें कीं, नुसत्या भावनेच्या भरांत बंगालच्या अनुकरणानें ही चळवळ महाराष्ट्रांत निघाली नसून, बुद्धिप्रामाण्याचे कसावर घासून आणि तीसुद्धां बंगालचे फार पूर्वीं आपल्याइकडे सुरू झालेली आहे. खरें पाहिलें असतां स. १८४८ चें सुमारासच महाराष्ट्रांतील आद्य सर्वांगीण सुधारक लोकहितवादी यांनींच स्वदेशीची चळवळ आपल्या लेखांतून करण्यास सुरवात केली होती. मात्र या लेखांतून नुसतें सर्वांनीं स्वदेशी वापरावें, या साध्या उपदेशापलीकडे लोकहितवादी गेले नव्हते. पण या वेळेपासून रानड्यांनीं आपल्या विद्वत्तापूर्ण वाणीनें स्वदेशीचें महत्त्व सर्वांना पटवून दिलें, येवढेंच नव्हे तर सार्वजनिक काकांनीं या त्यांच्या उपदेशाप्रमाणें प्रत्यक्ष कृती करण्यास आरंभिलें आणि इतरांनाहि त्यांनीं स्वदेशी व्रत धारण करण्याचा आग्रह सुरू केला.

सन १८७१ च्या अखेरीस माधवराव पुण्यास आल्यानंतर थोडक्याच दिवसांत स्वदेशी व्यापारोत्तेजनासंबंधीं विचारविनिमय होऊन एक कंपनी स्थापन करण्याच्या विचारांत काका होते. अर्थात् माधवरावांचें त्यांना साहाय्य होतेंच. एकादी नवी गोष्ट हातांशीं येतांच तिच्यावर चहूंबाजूंनीं विचार करावयाचा, त्या बाबतीवर असेल तेवढें वाङ्मय वाचावयाचें आणि मग लोकांना आपले विचार सांगावयास सज्ज व्हावयाचें ही माधव

रावांची प्रथा असे. या कंपनीमार्फत उगीच सरकारनें अमक्या अमक्या गोष्टी कराव्या, असे अर्ज करीत बसण्याचा याचकवृत्तीचा हीन मार्ग सोडून आपल्या हातांत असलेल्या अनेक मार्गांनीं स्वावलंबनाची कांस धरणेंच इष्ट आहे असें माधवरावांनीं या कंपनीच्या कामाच्या सभांमधून सुचविलें, येवढेंच नव्हे तर स. १८७२ अखेर व स. १८७३ च्या फेब्रुआरींत भरपूर माहितीनें ओतप्रोत भरलेलीं व सर्व जणांना कार्यप्रवण करणारीं विद्वत्ताप्रचुर अशीं दोन भाषणें त्यांनीं केलीं.

## पहिलें व्याख्यान

पहिल्या भाषणांत हिंदुस्थानांतल्या संपत्तिरसाचें इंग्रजी राज्यकारभार व व्यापार कसे शोषण करून घेत आहेत, याचें त्यांनीं भयानक चित्र रेखाटून जनतेपुढें मांडलें. " प्रजेकडून मिळणाऱ्या उत्पन्नाचा एकतृतीयांश म्हणजे सोळा कोट रुपये दरसाल अविच्छिन्नपणें विलायतेस जातात. कच्चा माल परदेशीं जातो, व त्या मानानें फारच कमी किंमतीचा पक्का माल देशांत येतो. त्यामुळें हिंदी कारागिरांच्या कलाकौशल्याचा क्षय होत असून सर्वांची प्रवृत्ति विलायती जिनसांकडे दिवसेंदिवस वाढत चालल्यामुळें स्वदेशीय जिनसांचा खप संसाराच्या सर्व कामांत कमी कमी होत आहे व ही गोष्ट सर्वांनीं ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. ' ज्या देशाच्या व्यापारांत मालाची आयातनिर्यात सारख्या प्रमाणावर असते, त्या देशाचा व्यापार उत्कृष्ट ' असा अर्थशास्त्राचा सिद्धांत आहे. पण हिंदुस्थानांत निर्यातीचें प्रमाण आयातीहून जास्त आहे, अर्थात् हिंदी व्यापाराची स्थिति शोचनीय, पण ती बदलण्याची सत्ता आपले हातांत नाहीं. व्यापार आणि राजकारण हीं दोन्हींहि साधनें परस्थांचे तावडींत सांपडलीं आहेत. देशांत कारखाने वाढवून

विलायती मालाच्या खपाची पिछेहाट करणें हें एक साधन आपल्या हातांत आहे, पण भांडवलाशिवाय सर्व गोष्टी व्यर्थ आहेत. साधारण अंदाजानें हिंदी जनतेच्या एकंदर धनसंचयाची मर्यादा दोनशें कोटि रुपयांचे वर जाते. खर्चवेंच वजा जातां ६०-६५ कोटींची निव्वळ बचत होते. तिच्यांतून पुनः सरकारच्या पदरांत. कर म्हणून सोळा कोट रुपये पडतात. अशा तऱ्हेनें धनसंचय बराच असून अखेर लोकांचे हातांत काय राहतें? भांड्याच्या बुडाला छिद्र ठेवून वरून पाणी भरण्याचा धडाका लावला तरी जसें भांडें भरत नाहीं त्याप्रमाणें या देशाचा उद्योग वाढला असूनसुद्धां या देशाचें सामर्थ्य शुष्क होत चाललें आहे. अर्थात् याला कारण परदेस्थांचा अम्मल, ही गोष्ट आहेच पण आपल्या लोकांची आत्मघातकी वृत्तीहि याला जबाबदार आहे. हिंदुस्थानखेरीज इतर सर्व देशांत अशी व्यवस्था आहे कीं जेवढें सोनेंरुपें, नाणें पाडण्याचें कामीं लागतें, तसेंच कलाबतू वगैरे किरकोळ व्यापारांत लागतें त्याखेरीज बाकी सोन्यारुप्याचा खप त्या देशांत होत नाहीं. त्याचा लागलींच व्यवहारांत उपयोग होऊन इतर द्रव्यांचें त्यांस रूपांतर मिळून देशांत रोजगारधंदे वाढविण्याचे कामीं तें उपयोगी पडतें. पण तशी स्थिति या देशाची नाहीं. विलायतची वरात संभाळून जें सोनें रुपें या देशांत येतें त्यांपैकीं निम्मे टांकसाळींत जातें व नाण्याला उपयोगी पडतें, पण बाकी निम्में देशांतच मुरतें—भुईत गढतें. लोक या सोन्याचा उपयोग आपल्या बायकामुलांच्या अंगावर दागिने घालण्याकरतां करतात, अर्थात्, या प्रचंड भांडवलाचा व्यापाराचे बाबतींत काडीइतकाहि उपयोग होत नाहीं. मालकावर प्रसंग आला तरच असें सोनें बाहेर निघावयाचें, व तेंहि असाच एकादा दागिनेवाला शोषून घ्यावयाचा. पण बहुशा लाख व झीज यांचे योगानें सर्वस्वी लय होईपर्यंत अशा सोन्याचे रूपांत बदल

होत नाहीं. आधींच आपला संचय थोडा, त्यांत विलायतेकडे जाणारी पैशाची ओढ भयंकर, त्यांतच अशा मूर्ख समजुती व चालीरीतिमुळें आपल्या संचयापैकीं बराच मोठा भाग म्हणजे सुमारे आठ कोटी दरवर्षीं दागिन्यांच्या रूपानें मातींत मिसळला जातो. ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे. पैसा खर्च करण्याचे अनेक प्रकार आहेत. दानधर्मापायीं गंगेंत बुडवणें, आप्तेष्टांचे भयापासून जमिनींत गाडणें, मुलाबाळांच्या व कुटुंबाच्या हौशीखातर दागिन्यांत खर्चणें, व उगींच मिजासींत उधळणें, असे अनेक प्रकार आहेत. तसेंच नफ्याच्या रूपानें दामदुप्पट वाढवून परत देणाऱ्या व्यापारांत पैसा घालणें, हाहि एक विनियोगाचा मार्गच आहे. यापैकीं ज्या देशांत शेवटचा मार्ग विशेष करून अवलंबिला जातो तो देश लवकर संपत्तिमान होतो ''—अशा सारांशाचें त्यांचें पहिलें भाषण होतें.

## दुसरें व्याख्यान

या विषयावर दिलेल्या दुसऱ्या भाषणांत माधवरावांनीं हिंदी व्यापाराच्या स्थितीचें विवेचन करून मागच्या व्याख्यानापेक्षांहि कळकळीनें त्यांनीं लोकांस कार्यप्रवण करण्याचा प्रयत्न केला. " इंग्रजी राज्यांत या देशाचा व्यापार वाढला. चहा कॉफी, नीळ या पदार्थांची लागवड नव्यानें होऊं लागून हजारों हिंदी मजुरांना रोजगार मिळाला. आगगाड्यांमुळें व्यापाराच्या वाढीस मदत झाली. लोंकर, कापूस, ताग, तांदूळ हा माल परदेशांत जाऊं लागला. पण देशाचें दारिद्र्य दुरावलें नाही. व्यापाराची व कंगालपणाची वृद्धी एकाच वेळीं कां व्हावी, हें एक विचित्र कोडें आहे. पण ही व्यापाराची वाढ इंग्रजांच्या भांडवलानें

व त्यांच्या ताब्यांतील साधनांनीं झाली, त्यायोगें सगळा नफा त्यांचेकडे जातो, व मजुरी—तीहि पोटभरण्याइतपत जेमतेम—फक्त आपल्याकडे राहते.

पृथ्वीवरील सर्व स्वतंत्र देशांत व्यापाराची अशी स्थिति असते कीं, त्या देशांतील निरनिराळे प्रांतांतच जो व्यवहार होत असतो, त्यापेक्षां त्या देशाचा अन्य देशांशीं होणारा व्यवहार कमी असतो. आपल्या देशाची स्थिति तशी नाहीं. एकंदरीनें पाहातां आपलाच माल बाहेर जास्त असतो.पण याचा अर्थ आपला व्यापार वाढला असा होत नाहीं.

परदेशांतून अनेकप्रकारचा उपयुक्त व अनुपयुक्त माल येत असतो. शिवाय विलायतेहून जो माल येतो, तो बहुधा इकडून गेलेल्या कच्च्या मालाचें रूपांतर केलेला पक्का माल असतो. त्यामुळें आपल्या किंमतीच्या मानानें कमी किंमतीचा माल येतो हें तर झालेंच; पण या पक्क्या मालामुळें आपल्याकडचे असंख्य कारागीर नामशेष झाले त्याची काय वाट ? शेतीच्या उत्पन्नांतील बराच माल परदेशीं जात असतो. पण इंग्लंडपेक्षां इतर देशांतच हा माल जाणें आपल्या फायद्याचे दृष्टीनें इष्ट असतें. पण ह्याहि व्यापार इंग्लंडच्याच मध्यस्थीनें व्हावयाचा. त्यामुळें अशा व्यापारांतलि नफा आपल्या देशांत न येतां परस्पर इंग्लंडांतच जातो. ''......

ज्या हिंदुस्थाननें प्राचीन काळीं साऱ्या जगताशीं प्रचंड व्यापार केला होता त्या देशाला नुसता शेतकीप्रधान देश ठरवून आपल्या प्रजेनें नुसता शेतकीचाच धंदा करावा असें सांगणाऱ्या सरकारचा व त्यांच्या कांहीं हस्तकांचा निषेध करून माधवराव म्हणाले, “ साधारणपणें कामधंदा करणारी प्रजा शेतांत कष्ट करणाऱ्या प्रजेपेक्षां सधन, शहाणी, समजदार, एक जुटीनें वागणारी

अशी असते. शहरांतील वस्तींत व खेडेगांवच्या वस्तीत जो भेद दिसून येतो तो अंशतः याच संबंधानें उत्पन्न होतो असें म्हटलें असतां चालेल. तांबट, सुतार, लोहार, रंगारी, कासार, गवंडी, कुंभार, सर्व जातीचा क्रयविक्रय करणारे वाणी उदीम लोक यांमधें शेती कुणबी लोकांपेक्षा स्वतंत्रता व सधनता जास्त नाहीं असें कोण म्हणूं शकेल. ... ..

...शेतकीच्या धंद्यांत पोट भरणाऱ्यांचें सामर्थ्य परिमितीचें असतें. इतर धंदे करणारे लोकांचें सामर्थ्य अपरिमित असतें असें म्हटलें तर चालेल. ज्या देशांत खेड्यांत राहणाऱ्या लोकांपेक्षां नगरवासी लोकांची म्हणजेच कामधंदे करणाऱ्या उदीम व कारागीर लोकांची वस्ती जास्त असते तोच देश सधन व सुखी असा साधारण सिद्धांत आहे. ......

...साधारणतः आपण आगगाडींत बसून जातों, तारायंत्रांतून आपले निरोप पाठवितों, विलायतेंत यंत्रसामर्थ्यानें जे सर्व सोयीचे व शोकाचे पदार्थ तयार होतात ते आपण आवडीनें भोगतों, या सुखांत आपण मग्न असतों, हा सर्व उत्साह आपण करतों, व आपले डोळे दिपतात. त्या वेळीं उत्साहतेजाची पडछाया आपणांस दिसत नाहीं म्हणून आपणांस यांतच सुख वाटतें. परंतु आपल्या-सारख्या समृद्ध देशांतील लोकांची स्थिति अशी व्हावी कीं, त्यांच्या निर्वाहाचें, सोयीचे, व शोकाचे सर्व पदार्थ त्यांस तयार करतां येऊं नयेत, केवळ आयते पदार्थ मात्र भोगण्याची अक्कल आपणांस असावी ही मोठी दुःखाची गोष्ट आहे, असें कोण म्हणणार नाहीं. यामधें देशाचें सामर्थ्य वाढलें असें होत नाहीं; उलट दिवसेंदिवस आपण सर्व लहानमुलें झालों आहोंत, त्या अवस्थेंत जसें दुसऱ्यावर अवलंबून राहणें जरूर पडतें, तद्वतच सर्व देशांतील प्रजेची स्थिति होत आहे. हें इष्ट आहे असें

कोण म्हणेल. आपणांस असें वाटतें कीं पहिल्यापेक्षां आपल्या देशाचा बंदोबस्त चांगला आहे, पण या घमेंडींत आपण निःशस्त्र झालों आहोंत ही गोष्ट विसरतों. म्हणजे राज्यसत्तेच्या संबंधानें आपला स्वतःचा बचावकरण्यास जसें आपण निर्बळ झालों आहोंत, त्याचप्रमाणें व्यापार व व्यवहार यांच्या संबंधानें आपलें पोषण व आच्छादन करण्यासहि आपण असमर्थ झालों आहों. या गोष्टी खरोखर अनिष्ट आहेत. त्यांचें प्रथमचें दर्शन मोहक दिसतें, पण परिणामी त्या अत्यंत घातक आहेत. म्हणूनच त्यांचेविषयीं फार जपलें पाहिजे. आपले लोक बिनबोभाट या भविष्यास अनुसरत आहेत, म्हणून तर त्याविषयीं आरडाओरड करणें अत्यावश्यक आहे. एकंदरीनें दिवसेंदिवस पराधीनपणाची व निःसत्त्वपणाची दशा देशांत प्राप्त होत आहे, ही अनिष्ट आहे. इष्टफलदायी नाहीं. ''

## स्वदेशीव्रताचे पाईक

सत्तर वर्षांनीं पुढें गेलेल्या आजच्या काळांतहि ज्या विचारांतील विदारक सत्य नाकबूल करतां येणार नाहीं, त्या माधवरावजींच्या या व्याख्यानांतील विचारांनीं त्या काळच्या पुणेंकरांचे हृदयावर चांगलाच ठसा उमटवला असेल यांत काय संशय ! या दोन व्याख्यानांनीं पुणेंकरांना माधवरावांच्या योग्यतेची ताबडतोब जाणीव झाली व त्यांनीं आपल्या सार्वजनिक जीवनाचें सुकाणूं माधवरावांच्या हातांत दिलें. सार्वजनिक काकांच्या मनावर तर या व्याख्यानांचा इतका परिणाम झाला कीं, त्यांनीं या वेळेपासून सर्व वस्तु स्वदेशी वापरण्याचें व्रत स्वीकारलें. आज ज्यांना खादीचें जनकत्व दिलें जातें, त्या गांधीजींचे जन्माचे वेळेस ( म्हणावयास हरकत नाहीं ) या सार्वजनिक काकांनीं स्वतः काढलेल्या सुताचे कपडे वापरण्याचा निश्चय केला होता. अर्थात् जिथें आजहि

गांधीजींच्या कल्पनेची अतोनात थट्टा होत असते, तिथें त्या वेळीं काकांची मनस्वी टिंगल झाली असेल हें उघड आहे. पण काका त्याला डरणारे नव्हते. त्यांनीं स्वतः आमरण स्वदेशी वस्तु तर वापरल्याच, पण त्या लोकांनीं वापराव्या असा प्रचंड प्रयत्न ते करीत असत.

## तत्त्वनिष्ठेची परीक्षा

अगदीं याच वेळीं माधवरावांचे खासगी आयुष्यांत असा एक प्रसंग आला कीं, ज्यामुळें त्यांच्या कर्तव्यनिष्ठेची परीक्षा पहावयास मिळाली आणि माधवरावांच्या दुर्दैवानें म्हणा कीं अन्य कारणांमुळें म्हणा, या लोकपरीक्षेंत माधवराव उत्तीर्ण झाले नाहींत. साठ वर्षांच्या उभ्या हयातींत माधवरावांचे आयुष्यांत असा एकच प्रसंग त्यांचेवर आला कीं,ज्या बाबतींत त्यांचेवर जनतेकडून टीका झाली. त्यांना या बाबतींत जनतेचें समाधान करतां आलें नाहीं. अर्थात् आपण जी गोष्ट केली त्याबद्दल खुद्द त्यांचें त्यांना पूर्ण समाधान वाटत होतें.

ती गोष्ट अशी. पुण्यास आल्यापासून त्यांच्या पत्नीस पुण्याची हवा मानवेनाशी होऊन, ती जीर्णज्वरानें आजारी पडली. थोडक्यांच दिवसांत त्यांच्या पत्नीचा जीर्णज्वर बळावला. या वेळीं माधवरावांनीं औषधोपचारांची हयगय वा स्वतःच्या कष्टांची मुळींच पर्वा केली नाहीं. पण ही सारी परिचर्या वायां जाऊन ऑक्टोबर १८७३ च्या तिसऱ्या तारखेस माधवरावांस विधुराव-स्थेंत टाकून त्यांची पत्नी स्वर्गलोकीं गेली.

लहानपणापासून आयुष्यांतील कौटुंबिक सुखदुःखांची भागी-दारिण ऐन तारुण्यांत आणि सांसारिक भरभराटीच्या मोक्यावर

सोडून जाण्यासारखें दुसरें दुर्भाग्य या जगांत कोणतेंहि नाहीं. या आत्यंतिक दुःखाबरोबरच दुसरें दुःख माधवरावांवर ओढवलें. तें म्हणजे ज्या नव्या तत्त्वप्रणालींचें पुढारीपण गेल्या कांहीं दिवसांपूर्वी त्यांनीं पत्करलें होतें, त्याच तत्त्वांचा केवळ वृद्ध पित्याच्या समाधानासाठीं त्यांनीं केलेला त्याग हें होय. माधवरावांचे वडील गोविंदराव हे पूर्णपणें जुन्या चालीचे असून अतिशय धर्मनिष्ठ असे होते. आठ मुलांना जन्म दिलेली आपली प्रथम पत्नी दिवंगत होतांच सोळाव्या दिवशींच मुंडावळ्या बांधणाऱ्या त्यांना, या जगांत गतपत्नीबद्दल भावना असतात हें कसें कळणार ? सरकारदरबारीं आणि सामान्य जनतेच्या मनांत ज्या माधवरावांच्या बुद्धिमत्तेला अत्यंत मान होता,त्यांना त्यांचे वडील अजून लहानच समजत असत. आपला माधव हा देशांत उठलेल्या नव्या विचारांच्या लाटेंतील एक अग्रेसर आहे, कदाचित आलेल्या या प्रसंगामुळें पुनर्विवाहासारख्या नव्या सामाजिक सुधारणांना तो बळी पडेल, असे विचार सुनेच्या मृत्यूची बातमी ऐकतांच त्यांचे मनांत आले. तत्काल कोल्हापुराहून ते पुण्याला आले. माधवाला मुम्बईहून येणाऱ्या पत्रांतून पुनर्विवाहाच्या सूचना येत असलेल्या त्यांना आढळून येतांच,आपली शंका रास्त आहे असें त्यांना वाटल्याशिवाय राहिलें नसेल. म्हणून प्रथम त्यांनीं आलेलें टपाल एकदम माधवाला मिळूं न देण्याची व्यवस्था केली. तसेंच मुम्बईची कोणी स्नेहीमंडळी प्रत्यक्ष पुण्याला येऊन माधवरावांना चिथविण्याचे आंतच त्यांनीं मुली बघण्याचें कार्यहि सुरू केलें.

## तत्त्वनिष्ठा कीं पितृभक्ति

थोडक्या दिवसांत त्यांनीं अण्णासाहेब कुर्लेकर यांच्या मुलीशीं माधवरावांच्या अगदीं मनाविरुद्ध लग्न ठरविलें सुद्धां. माधवरावांचे

मनांत एवढी जाज्वल्य पितृभक्ति होती कीं, प्रत्यक्ष आपल्या तत्त्वांवर निखारा ठेवण्यासहि केवळ वडिलांचे मनासारखें वागण्यांत त्यांना संकोच वाटला नाहीं. लग्न लांबणीवर टाकण्याची आपली कल्पना त्यांनीं वडिलांस बोलून दाखविली, घरांत अवघ्या एकविसाव्या वर्षीं वैधव्य पावलेली धाकटी बहीण असतां आपण लगेंच बाशिंग बांधणें आपल्याला बरें वाटत नाहीं असेंहि त्यांनीं वडलांस सुचविलें. फार काय आपण पुनर्विवाह करूं अशी शंका येत असल्यास यापुढें आमरण विवाह करण्याचें मनांतसुद्धां आणणार नाहीं अशी शपथ घेण्याची तयारी दाखविली, अखेर आपणांस विलायतेस जाण्याचें असल्यामुळें सहा महिने लग्न करणें शक्य नाहीं असेंहि त्यांनीं सांगितलें. पण या प्रकारांनीं गोविंदराव अतिशयच चिडले. तेव्हां त्यांच्या म्हणण्यास कबुली देण्याशिवाय त्यांस दुसरा इलाजच दिसेना. अशा परिस्थितींत केवळ वडिलांचे इच्छेखातर परत सन १८७३ च्या डिसेंबरांत त्यांचें लग्न वर उल्लेखिलेल्या अण्णासाहेब कुर्लेकरांच्या मुलीशीं झालें. हीच मुलगी म्हणजे पुढें प्रसिद्धीस आलेल्या रमाबाईसाहेब होत. या वेळीं त्या अवघ्या अकरा वर्षांच्या होत्या. माधवराव या लग्नाचे बाबतींत इतके उदासीन होते कीं, खुद्द लग्नाचे दिवशींसुद्धां त्यांनीं कोर्टाचे कामाची रजा घेतली नव्हती. दुपारभर कोर्टाचें काम करून संध्याकाळीं ते घरीं आले व गोरजमुहूर्तावर बोहल्यावर उभे राहिले. एवढेंच नव्हे तर दोनतीन तासांत लग्नासंबंधीं वेदोक्त विधि आटोपून, आपल्या नूतन पत्नीसह साडेदहाचे सुमारास चालतच ते घरीं आले.

प्रथम पत्नीच्या निधनानें माधवरावांना आत्यंतिक दुःख झालें होतें. पहिल्या वर्षांत या प्रथम पत्नीची आठवण होऊन डोळ्यांतून पाणी गेलें नाहीं असा एक दिवसाहि जात नसे. आणि या दुःखांतच

त्यांच्या नव्या लग्नामुळें ओढवलेल्या नव्या दुःखानीं भर घातली. ज्या तत्त्वांचा त्यांनीं आजपर्यंत मोठा पुरस्कार केला, त्याच तत्त्वांना त्यांनीं आतां बाजूला सारलें होतें. केवळ पित्याच्या समाधानाकरतां ही गोष्ट केली असली तरी या करण्यानें त्यांचें अंतःकरण जळत होतें. लग्नानंतर रात्रीं घरीं परत येतांच त्यांच्या मनाला किती असह्य ताप झाला असेल ही कल्पना करावी. त्यांचेवर त्यांचें कांहीं हितशत्रू भरमसाट टीका करूं लागले होतेच, पण त्यांचे मित्रसुद्धां या वेळीं शत्रूच्या गोटांत सामील झाले होते. " कुमारिकेशीं लग्न केल्यानें विधवाविवाह पक्षाशीं दगाबाजी करून तत्त्वद्रोहाचें पातक लावून घेतलें व ज्या त्यांच्या कर्तृत्वाबद्दल सर्वांना प्रचंड आशा वाटत होती, त्याला त्यांनींच आपल्या हातांनीं काळोखी फासली," असा आरोप जो तो त्यांचेवर करूं लागला. सामाजिक सुधारणेची माधवरावासारख्या अधिकारी पुरुषानेंच हत्या केली असें त्यांचे मित्र म्हणूं लागले तर " हे कसले सुधारणा करणार ! नुसते बोलघेवडे हे ! वेळ येतांच त्याच्या बात्तिसाव्या वर्षीं गुडघ्याला बाशिंग बांधून अकरा वर्षांच्या मुलीशीं लग्न करणारे हे " अशी हेटाळणी त्यांचे शत्रू करूं लागले. परंतु माधवरावांच्या स्वभावांतील खरी गोम ज्यांना समजली होती त्यांनीं माधवरावांना कधींच दोष दिला नाहीं. माधवरावांचा स्वभाव जात्याच धार्मिक. पित्यासाठीं आजन्म ब्रह्मचारी राहणाऱ्या भीष्माच्या, किंवा पित्याचें समाधान करण्यासाठीं वनवास पत्करणाऱ्या रामाच्या भरतखंडांतील ते एक सुपुत्र होते. वैयक्तिक स्वार्थापेक्षां कौटुंबिक शांतिसमाधानालाच ते अधिक महत्त्व देत असत. आणि म्हणूनच त्यांनीं तत्त्वच्युतीचा दोष पत्करूनाहि वडिलांना बरें वाटण्यासाठीं हें लग्न केलें होतें. या बाबतींत श्री. रमाबाईनीं आपल्या आठवणींत लिहिलेलीं तीनच वाक्यें

अर्थपूर्ण आहेत. " स्वतःच्या सर्व आयुष्यामध्यें गौण व कमीपणाचा जर कांहीं भाग असेल तर हाच आहे असा दोषारोप करण्यांत येतो, व ही गोष्ट मोठ्या आवेशानें उच्चारली जाते. पण यासंबंधानें मला तर उलट असें वाटतें कीं सर्व चरित्रामधें खऱ्या स्वार्थ-त्यागाच्या व मनाच्या मोठेपणाचा जो कांहीं भाग असेल त्यांमध्यें अत्यंत उदात्त व महत्त्वाचा भाग हाच होय. ...खऱ्या भक्तीनें एकंदर चरित्राकडे अवलोकन करणारांपैकीं कोणासहि असेंच वाटेल. "

आपण एका अशिक्षित मुलीशीं लग्न लाविलें या गोष्टीचे माधव-रावांना वाईट वाटत होतें. म्हणून अगदीं सुरवातीपासूनच त्यांनीं व्यवस्थित रीतीनें रमाबाईचें शिक्षण सुरू केलें; व रमाबाईनींहि अत्यंत हालअपेष्टा सोसून शिक्षण चिकाटीनें चालू ठेविलें.

## उत्तरेचा प्रवास

लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं चार महिन्यांची रजा घेऊन माधवरावांनीं उत्तर हिंदुस्थानची सफर काढली. आपल्या कांहीं स्नेह्यांनाहि त्यांनीं बरोबर बोलावलें होतें. पैकीं बाळ मंगश वागळे, शंकर पांडुरंग पंडित, वगैरे कांहीं मंडळी त्यांचे बरोबर गेली होती. या प्रवासांत ते पंजाबपर्यंत जाऊन आले. या स्वदेश-पर्यटनांत नुसत्या स्थलावलोकनाबरोबरच त्यांनीं त्या त्या भागांतील आर्थिक, धार्मिक व सामाजिक स्थितीचा सूक्ष्म अभ्यास केला असल्यास, ते त्यांच्या स्वभावास अनुसरून असेंच होतें.

## सार्वजनिक सभेचें वाढतें कार्य

खासगी आयुष्यांतील गडबडींत असतांनासुद्धां त्यांचें सार्वजनिक कार्य चालूंच होतें. सन १८७२ सालीं त्यांनीं सार्वजनिक काकांना

हातांशीं धरून स्वदेशीची चळवळ सुरू केली हें वर आलेंच आहे. त्याच वर्षी पार्लमेंटमध्यें हेन्री फॉसेट यांना ब्रायटनच्या मतदारांनीं निवडून दिल्याबद्दल मतदारांचें अभिनंदन करण्याची कल्पना मुंबई व कलकत्ता येथें निघाली. या संधीचा फायदा घेऊन सार्वजनिक सभेमार्फत ब्रायटनच्या मतदारांचें अभिनंदन करून सार्वजनिक सभेचें नांव इंग्लंडपर्यंत पोंचविलें गेलें. याच वेळीं महाराष्ट्रांतील कांहीं जिल्ह्यांतून दुष्काळाचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. ताबडतोब माधवरावांनीं सार्वजनिक सभेंत सगळ्या महाराष्ट्रांतील जिल्ह्यांची सांपत्तिक स्थिति पाहण्याचा व शेतकऱ्यांची आर्थिक परिस्थिति अवलोकन करण्याचा ठराव मांडला. अर्थात् तो ठराव पास झाला, येवढेंच नव्हे तर त्याप्रमाणें प्रत्यक्ष कार्यासहि सुरवात झाली. पुढील वर्षी हिंदी जमावंदीच्या व्यवस्थेचा विचार करण्यासाठीं पार्लमेंटनें एक कमिटी नेमली होती, व हिंदुस्थानातून कांहीं प्रतिनिधी सदर कमिटीपुढें साक्ष देण्याकरतां पाठविण्याचें योजिलें होतें. मुंबईच्या बॉंबे असोसिएशनच्या वतीनें नौरोजी फर्दुमजी विलायतेस निघाले होते. त्यांनाच सार्वजनिक सभेनें आपले प्रतिनिधित्व देऊन आपल्या संस्थेचें या बाबतींत पूर्ण लक्ष आहे हें सर्वांना पटवून दिलें. माधवरावहि याच कमिटीपुढें साक्षीस जाणार असा त्या वेळीं बराच बोलबाला झाला होता. पण तसें घडलें नाहीं. तरी पण अगदीं सुरवातीपासून या कमिटीच्या कामकाजांकडे माधवरावांचें पूर्ण लक्ष होतें. तिकडे झालेल्या साक्षींचा रिपोर्ट इकडे येतांच माधवराव त्यावर एक परीक्षणात्मक विद्वत्ताप्रचुर लेख लिहीत असत. येवढेंच नव्हे तर पुढें कमिटीचें काम संपुष्टांत आल्यावर कमिटीतर्फे प्रसिद्ध झालेल्या रिपोर्टावर विवेचन करणारा एक ग्रंथहि माधवरावांनीं प्रसिद्ध केला. सन १८७३ सालीं सार्वजनिक सभेमार्फत झालेल्या आर्थिक पहाणीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला.

देशांतील शेतकऱ्यांची हलाखी केवळ सरकारच्या धोरणामुळें झाली आहे असें स्पष्टपणें या रिपोर्टांत नमूद केलें होतें. आपल्या देशांतील आपल्या दुःखाला आपणच वाचा फोडली पाहिजे, सरकारच्या ओंजळीनें पाणी न पितां स्वतंत्र रीतीनें आपल्या दुःखांचा आपणच विचार करून त्यावर उपाययोजना करण्याचा प्रयत्न केला पाहिजे, ही गोष्ट सार्वजनिक सभेमार्फत माधवरावांनींच शिकविली. सन १८७४त माधवरावांच्या प्रेरणेस अनुसरून 'सार्वजनिक सभे' नें जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीचा अर्ज पार्लमेंटकडे, पार्लमेंटच्या प्रसिद्ध सभासदांकडे व कित्येक वर्तमानपत्रांकडे धाडून दिला. 'हिंदी जनतेचे कांहीं प्रतिनिधी पार्लमेंटांत घेऊन हिंदी प्रश्न त्यांचे संमतीनें सोडवावे' अशी त्यांत मागणी करण्यांत आली होती. या मागणीला सामान्य जनतेचा पाठिंबा आहे हें दाखवण्यासाठीं हजारों लोकांच्या सह्या घेण्यांत आल्या होत्या. ज्या वेळीं अक्षरशः सारा भारतवर्ष पारतंत्र्याच्या गाढ निद्रेंत घोरत पडला होता, त्या वेळीं 'जबाबदार राज्यपद्धतीची मागणी' करणारे माधवराव चटकन् सरकारी अधिकाऱ्यांच्या डोळ्यांत भरले असतील यांत काय संशय!

आणि या मागणीमुळें सार्वजनिक सभा आणि तिचे कर्णधार माधवराव यांच्या चळवळींकडे सरकार विशेष जागरूकतेनें लक्ष ठेवूं लागलें. सन १८७५ सालीं बडोदें संस्थानांत अचानकपणें मल्हारराव प्रकरण उद्भवलें. वास्तविक मल्हाररावांबद्दल कोठें फारशी सहानुभूति होती असें म्हणवत नाहीं. पण सन १८७४ चे अखेरीस जेव्हां तेथील रेसिडेंटनें मल्हाररावांवर विषप्रयोगाचा आरोप ठेवून त्यांस पदच्युत केलें, तेव्हां त्यांचेकडे सर्वांचें लक्ष गेलें. त्यांचें राज्य तर गेलेंच पण त्यांचेजवळ एक फुटकी कवडीहि शिल्लक नसल्यामुळें, त्यांना आपल्या बचावाचाहि प्रयत्न करतां येणें

अशक्य झालें होतें. या त्यांच्या अकिंचन परिस्थितीचा बोभाटा कानीं येतांच ‘ आपण एक लाख रुपये उभे करण्याची तयारी करतों ’ अशी सार्वजनिक सभेनें त्यांना तार करून त्याप्रमाणें चळवळ करण्यास सुरवात केली. पुढें बचाव करूनहि मल्हारराववांवर आरोप शाबीत होऊन ते पदच्युत झाले, ही गोष्ट खरी असली तरी प्रसंगाचें महत्त्व व त्यासंबंधीं जागरूकता सार्वजनिक सभेंत माधवरावांनीं किती उत्पन्न केली होती, हें चटकन् साऱ्या लोकांचें ध्यानांत आलें. या जागरूकतेमुळेंच सरकारचे मनांतील सार्वजनिक सभेविषयींचा संशय दुणावला.

## एक गुप्त हेर

येवढेंच नव्हे तर या सार्वजनिक सभेमध्यें कोण लोक आहेत व या सभेचे पुढारी कोण आहेत, ह्या गोष्टीचा शोध घेण्यासाठीं गुप्त हेरांचें जाळें सरकारनें सबंध पुणें शहरभर पसरून दिलें होतें. अर्थात् सार्वजनिक सभेच्या बुडाशीं माधवराव आहेत, ही कल्पना झाल्यामुळें त्यांचे व्यवहारहि हे गुप्त हेर जारीनें पहात असल्यास नवल नाहीं. पण माधवरावांनीं ही स्थिति ताबडतोब जाणली. त्यांचे अनेक स्नेही मात्र गफलतीनें वागत. असाच एक गुप्तहेर एका बड्या खुशालचंदाचें रूप घेऊन माधवरावांच्या कांहीं मित्रमंडळींत वावरत होता; व तेहि निःसंकोचपणें त्याच्या मैत्रीचा आणि त्यानें वारंवार दिलेल्या पाहुणचाराचा स्वीकार करीत बहुतेक फुरसतीचा वेळ या गृहस्थाचे घरीं घालवीत असत. पण माधवरावांना यांत कांहीं काळेंबेरें असावें असा चटकन् संशय आला व त्याप्रमाणें या गृहस्थाचीं पत्रें कोठून येतात याची चौकशी करावयास त्यांनीं आपल्या एका स्नेह्यास सांगितलें. दोनच दिवसांत सिमला व कलकत्ता येथूनच फक्त त्याचीं

पत्रें येतात व जातात, असें कळून येतांच सर्वांना त्याचें स्वरूप उघड झालें. अर्थात् त्यानेंहि मग लगेंच पोबारा केला. पण यावरून सरकारची माधवरावाबद्दलची बदललेली दृष्टि सर्वांना कळून चुकली. या अशा परिस्थितींतहि एका नव्या प्रसंगाला चालना देण्याचें काम माधवरावांनीं अंगावर घेतलेंच.

## दंग्याबाबत काम

सन १८७६ त महाराष्ट्रांत मोठा दुष्काळ पडून त्यामुळें जिकडेतिकडे दंगे व रक्तपात झाला. सावकारांनीं कुळांना देण्या-घेण्याचे बाबतींत लुबाडलें असेल व म्हणूनच जनतेनें त्यांचेवर सूड घेतला, अशी जिकडे तिकडे सर्वांची समजूत झाली व सरकारनेंहि आपल्या दोषावर पांघरूण घालण्यासाठीं या दंग्याचें खापर सावकारांचेच माथ्यावर फोडलें. पण माधवरावांच्या भेदक दृष्टीला 'ही शुद्ध लपवाछपवी आहे, खरें कारण निराळेंच आहे ', हें तत्काल उमगलें. पण आपले विचार प्रगट करण्याची त्यांनीं घाई केली नाहीं. नाहींतर अगोदरच संशयपिशाच्चानें पछाडलेलें सरकार, ऐन दंग्याचे भरांत सावकार दोषी नसून सरकारच दोषी आहे असें ऐकतांच चिडून जाईल व आपलीच उचलबांगडी काय, पण सार्वजनिक सभेलाहि नेस्तनाबूद करण्यास सरकार कमी करणार नाहीं याबद्दल माधवरावांना भय वाटत होतें. म्हणूनच दंगे शांत झाल्यावर जेव्हां सगळें वातावरण स्वच्छ झालें, तेव्हां सार्वजनिक सभेमार्फत या दंग्यासंबंधीं एक अर्ज सरकाराकडे पाठविण्यांत आला. " सावकारापासून शेतकऱ्यांना कर्ज काढावें लागतें, अर्थात् त्यामुळें सावकार गरीब शेतकऱ्यास छळत नसतील असें म्हणवत नाहीं, पण झालेला दंगा हा नुसता वरील कारणांमुळें झाला नसून त्याला कांहीं दुसरींहि कारणें आहेत, ही गोष्ट सरकारनें दृष्टिआड करूं नये. पिकें येतात कीं न येतात हें

पाहिल्याशिवायच सरकार साऱ्याची आकारणी करतें. अर्थात् हा सारा डोईजड होता, याबद्दल सरकारी रिपोर्टांतच पुरावा आहे. असा डोईजड सारा भरण्यासाठीं शेतकऱ्याला सावकाराचें घर शोधावें लागतें; नाहींतर शेत जाण्याची भीति असते. अशा तऱ्हेनें मुळांत सरकारच दोषी असून दंग्याचें मूळ सरकारचे धोरणांतच आहे ' अशी विचारसरणी माधवरावांनीं या अर्जांत मांडली होती. ती बिनचूक होती हें दंग्याच्या चौकशीसाठीं बसलेल्या कमिशननेंहि पुढें मान्य केलें.

## दयानंदांचीं व्याख्यानें

या गडबडीच्या काळांत आपल्या प्रार्थनासमाजाला आणि त्याच्या धार्मिक चळवळीला माधवराव विसरले नव्हते. 'आर्यसमाज' स्थापन करणारे भारतविख्यात दयानंदसरस्वती महाराज कांहीं कारणासाठीं या वेळीं म्हणजे १८७७ चे सुरवातीस मुंबईस आले होते. गोपाळराव देशमुखांसारखी बडी बडी मंडळी त्यांच्या चाहात्यांमध्यें असल्यानें, मुंबईस त्यांचीं व्याख्यानें मोठ्या प्रमाणावर चालत असून, त्यांच्या व्याख्यानांना श्रोतृसमुदायहि चिकार येत असे. वास्तवीक स्वामीजींच्या आर्यसमाजाचे विचारप्रणालींत आणि प्रार्थना समाजाचे विचारप्रणालींत महदंतर. पण स्वामीजींची ख्याति सर्वत्र असल्यानें अशी संधि दवडूं नये म्हणून माधवरावजींनीं त्यांना खास आमंत्रण देऊन पुणें येथें बोलाविलें. व दोन महिने त्यांचीं व्याख्यानें करविलीं. स्वामीजींनीं आपल्या वाणीनें आणि विचारसरणीनें साऱ्या हिंदुस्थानभर आपलें श्रेष्ठत्व पटविलें होतें. पण पुणेंकर सनातन मंडळींना त्याचें काय होय ? त्यांना सनातनधर्मावर हल्ला चढविणारे स्वामीजी आणि त्यांना पाचारण करून त्यांचीं पाखंडी मतें ऐकणारे पुण्यांतील

सुधारक हे दोघेहि धर्मभ्रष्ट वाटत. पण जोंपर्यंत स्वामीजींचीं नुसतीं व्याख्यानें चालत, तोंपर्यंत या सनातनीब्रुवांना आपलीं बोटें मोडण्यावांचून कांहींच करतां येत नसे. फार तर गांवांतील गटारयंत्रावर स्वामीजी आणि त्यांचे भगतगण यांचे नांवानें आचकट-विचकट बोलणें त्यांना शक्य होतें, व तेवढें ते लोक करीतहि असत. पण जेव्हां स्वामीजींचीं व्याख्यानें संपत आल्यावर त्यांची एक मिरवणूक काढावयाची त्यांच्या चहात्यांनीं ठरविली, तेव्हां या सनातनी गुंडांना आपल्या मर्कटभावनांचें प्रदर्शन करावयास चांगलीच संधि मिळाली.

## गर्दभानंदांची मिरवणूक

अगोदर दयानंदांचा पुणेकरांतर्फे चाललेला सन्मान पुण्याच्या सनातन्यांना अपमानास्पद वाटत होता. त्यांतून ही त्यांची मिरवणूक म्हणजे तर त्यांना अपमानाच्या जखमेवरील मिठासारखीच भासली. लगेंच त्यांनीं या मिरवणुकीची थट्टा करण्याचे निमित्तानें एका गाढवाला पकडलें, त्याला स्वामीजींच्या प्रमाणेंच कपडे घातले, आणि या गर्दभानंदांच्या जयजयकारांत गांवभर मिरवणूक काढली. भाद्रपद महिना असून सुद्धां लोकांना फाल्गुनमहिना आल्याची क्षणभर शंका वाटली. आपण दयानंदांची मिरवणूक काढावयाचें ठरविल्यामुळें हें प्रकरण उपस्थित झालें असावें असें वाटल्यावरून, कांहीं मंडळींना ही मिरवणूक रद्दच करावी असें वाटलें. त्याप्रमाणें कांहीं लोक माधवरावजींचा सल्ला घेण्यासाठीं त्यांचेकडे गेले. 'गांवांत असे प्रकार चालले आहेत, प्रसंगीं मारामारी होण्याचा संभव आहे,' अशी माहिती सांगून त्यांनीं मिरवणूक बंद करावयाची कां असें विचारलें. त्यावर शांतपणानें माधवरावांनीं उत्तर दिलें, "या मिरवणुकीनें एक कसोटी लागणार आहे,सुधारणेच्या झेंड्यामागें

कोणकोण येण्यास तयार आहेत हें तरी सर्वांना कळेल. तसेंच आपल्या मिरवणुकीनें आपलें सामर्थ्य किती आहे हें आपल्या प्रतिपक्षाला समजून येईल. छळाच्या भट्टींतूनच सुधारणा तावून सुलाखून निघाली पाहिजे. दगडांचा, प्रसंगीं गटारांतील घाणीचा जरी वर्षाव झाला तरी तो सोसावयास माझी तयारी आहे, व तुमचीहि सर्वांची असली पाहिजे. तेव्हां आपली मिरवणूक ही निघालीच पाहिजे. ''

दुसरे दिवशीं म्हणजे पांच सप्टेंबर रोजीं दुपारीं दयानंदांची मिरवणूक निघाली. बुधवार पेठेंत भिड्यांचे वाड्यांत स्वामींचीं व्याख्यानें होत असत. भिड्यांचे वाड्याजवळ दयानंदांची मिरवणूक येऊन पोंचते न पोंचते तोंच समोरून गर्दभानंदांची मिरवणूक येऊन धडकली. पण स्वामीजी येवढ्या काळांत वाड्यांत पोंचल्यामुळें त्यांना बाहेर आलेल्या हिंदुधर्मरक्षकांचें स्वरूप व त्यांनीं केलेल्या वर्तणुकीचें प्रदर्शन दिसलें नाहीं येवढेंच. भर रस्त्यांतच स्वामीजी आणि त्यांचे चाहते यांना गांठून त्यांचेवर हल्ला करण्याचे सनातन्यांचें ईप्सित अशा तऱ्हेनें विफल झालेलें पाहून तथेंच बाहेर उभ्या असलेल्या कांहीं गरीब मंडळींना व खुद्द स्वामीजी ज्या हत्तीवर बसले होते त्या हत्तीलाच आपला प्रसाद देण्याचें काम सुरू केलें. त्याच दिवशीं वरुणराजानें पावसाच्या रूपानें या हिंदुधर्मरक्षकांची सोय करून रस्त्यांत चांगलाच चिखल केला होता. आपण ज्यांचेवर हल्ला करावयास आलों ते लोक आपल्या हातांतून सुटले व आतां शांतपणानें आंत स्वामीजींचें व्याख्यान ऐकत आहेत हें दृश्य त्यांना पाहवेना. त्यांनीं रस्त्यावरच्या चिखलाचे गोळे करून आंत वाड्यांतील वरच्या दिवाणखान्यांत फेंकावयास सुरवात केली. बऱ्याच लोकांना चिखलाचा प्रसाद मिळाला. खुद्द माधवरावांचेंहि सारे कपडे चिखलानें भरले होते. वास्तविक दयानंदाचे बरोबर पोलिसांची

तुकडी होती, पण शक्यतोंवर पोलिसांनीं मध्यें पडूं नयेच अशी त्यांना विनंती केली होती. बाहेरून चिखलमार होत आहे हें पाहून कांहीं मंडळींनीं ऐन चिखलगोळ्यांच्या मारांत बाहेर येऊन गॅलरी-मधील सारीं खिडक्यादारें बंद केलीं. यामुळें तर सारे सनातनी इतके चिडले कीं, दयानंद स्वामी व त्यांचे सन्मानांतील पुढारी यांचे नांवानें त्यांनीं अक्षरशः शिमगा करावयास सुरवात केली. असा प्रकार रात्रीं साडेनऊ वाजेपर्यंत चालला होता. अखेर स्वतः शहर मॅजिस्ट्रेट तेथें आले व त्यांनीं दंगल मोडून काढली.

याच वर्षीं पुणें येथें टाउन हॉल बांधावयाची कल्पना माधव-रावांनीं काढली व स्वतः आठशें रुपयांचा वर्गणीचा आंकडा टाकला. अर्थात् इतर बऱ्याच जणांकडून भराभर वर्गणीचे आंकडे पडले. थोडक्याच दिवसांनीं हिराबागेंतल्या इमारतींत टाउन हॉलची योजना आंखण्यांत आली. वास्तविक हल्लींची हुजूर-पागेची इमारतच त्या वेळीं टाउन हॉलसाठीं घेण्याचे प्रथम सर्वानुमतें ठरत होतें. पण ऐनवेळीं अनपेक्षित अडचणी उद्भवल्या, त्यामुळें गांवाबाहेरील हिराबागच पसंत करणें प्राप्त झालें.

## दोन मृत्यु

पुढील दोन वर्षांत माधवरावांवर दोन दुःखद प्रसंग ओढवले. सन १८७६ मध्यें त्यांचे परममित्र विष्णुशास्त्री पंडित हे महा-बळेश्वर येथें मृत्यु पावले. इंदुप्रकाशामध्यें काम करीत असल्यापासून माधवरावांचे व त्यांचे संबंध जिव्हाळ्याचे होते व पुढें पुनर्विवा-हाच्या झालेल्या प्रचंड चळवळींत तर या दोघांनीं खांद्याला खांदा देऊन सनातन्यांशीं लढत केली होती. पुढें १८७४ सालीं खुद्द विष्णुशास्त्र्यांनीं पुनर्विवाह केला होता याचा उल्लेख वर आलाच आहे.

या त्यांच्या पुनर्विवाहानंतर ते पुणें येथें आले असतां माधवराव-जींनीं त्यांना आपल्या घरीं जेवावयास बोलावलें होतें. तेव्हां माधवरावांवर एक चमत्कारिक प्रसंग ओढवला. तो रमाबाईंनीं आपल्या आठवणींत चांगल्या तऱ्हेनें रंगविला आहे.त्यांच्याच शब्दांत तो प्रसंग असाः—

## पितृभक्त माधवराव

"सन १८७५ मार्चमधील गोष्ट. नुकतांच विष्णुशास्त्री पंडित यांचा पुनर्विवाह झाला व ते महाबळेश्वरीं जाण्याकरितां पुण्यास आले होते. कचेरीची गडबड फार असल्यामुळें त्यांना रात्रींच मेजवानीस बोलाविलें होतें. दुपारीं जेवतेवेळीं स्वतः वन्संना सांगितलें कीं, 'आज रात्रीं विष्णुशास्त्री पंडित व कांहीं मंडळी जेवावयास बोलाविली आहेत, बेत चांगला ठेवा.'

कचेरी असेल त्या दिवशीं स्वतःचें व मामंजींचें जेवण दुपारीं एकदम होत नसे; कारण मामंजी ११ वाजण्याचे पुढें आंघोळीला उठत. संध्या, ब्रह्मयज्ञ, जप, स्तोत्रपाठ होईपर्यंत सहज १२ वाजत. त्यामुळें १०॥ वाजतां स्वतःची व मुलांची पंगत होई. ह्यावेळीं मामंजी सासूबाई वगैरे मंडळी बाबाभाऊजींच्या मुंजीकरितां आलेली अजूनहि पुण्यासच होती. अर्थात् पहिल्या पंक्तीच्या वेळेस वन्संच्याजवळ स्वतः सांगितलें; तें दुसरी पंगत बसली तेव्हां सहज गोष्टीवरून मामंजींना कळलें. आज संध्याकाळीं विष्णुशास्त्री पंडित यांना आपल्या घरीं मेजवानी आहे, ही बातमी ऐकून मामंजींना राग आला, पण ह्या वेळीं ते कांहीं बोलले नाहींत. चारपांच वाजतां देवाला जातेवेळीं सासूबाईंना हांक मारून त्यांनीं सांगितलें कीं, "आज तुम्ही पंक्तींत वाढावयाला जाऊं नका. ती मुलगीच वाढील, तुम्ही जेवून घ्या."

आमच्या घरीं ब्राह्मण अगर बाईचें वाढणें कोणालाच आवडत नसल्याकारणानें आम्ही वरच्या बायकांनींच दोन्ही वेळ वाढावयास घेतलें पाहिजे, अशी चाल होती. ' मला यावयाला रात्र होईल. तुम्ही जेवून घ्या; माझी वाट पाहूं नका.' असें सांगून तिन्हीसांजपासून मामंजी एकदां बाहेर गेले, ते अकरा वाजेपर्यंत घरीं आले नाहींत. इकडे पाहुणेमंडळी जेवून जिकडली तिकडे गेली. मामंजी अकरा वाजतां घरीं आले आणि बाळंभटजींना हांक मारून म्हणाले, ' आम्हांला उद्यांच्या उद्यां करवीरास जावयाचें आहे. भल्या पाहटेंच उठून गाड्या ठरवून आणा. ' असें सांगून कांहीं जेवणफराळ न करतां तसेंच निजावयास गेले.

ही सर्व हकीकत वन्संकडून स्वतःस कळल्यावर, मामंजींचा स्वभाव करारी असल्यामुळें, त्यांचा कोल्हापुरीं जाण्याचा बेत ऐकून वाईट वाटलें व आपला हेतु नसतांना क्षुल्लक गोष्ट इतक्या निकरावर आली त्यामुळें स्वतःला रात्रभर चैन पडलें नाहीं. सकाळीं उठल्याबरोबर प्रातर्विधि उरकण्याच्या पूर्वींच मामंजी ओसरीवर बसले होते तेथें जाऊन एका खांबाशीं मुकाट्यानें उभें राहाणें झालें. मामंजींनीं पाहिलें; पण आपलें तिकडे जसें काय लक्षच नाहीं, असें दाखवून ते कांहीं बोललेच नाहींत, आम्ही घरांतील मंडळी मात्र देवघरच्या जाळींतून दाराआडून पुढें काय होतें तें पाहात उभी राहिलों. कारण मामंजींचा कोल्हापुरीं जाण्याचा बेत ऐकून धाक वाटला. सुमारें एक तास तसाच निघून गेला. दोघांपैकीं, कोणीं कोणाशीं बोललें नाहीं व दृष्टादृष्टहि होऊं दिली नाहीं. कारण प्रत्येकाला असें वाटत असावें कीं दुसऱ्यानें आधीं बोलावें. मग शेवटीं मामंजींनीं वर पाहून नांव घेऊन सालीं बसावयास सांगितलें. ते नेहमीं पांच अक्षरीं नांवानें ' माधवराव ' अशी हाक मारीत असत. बराच वेळ झाल्यावर पुनः मामंजींनीं बसावयास

सांगितलें. तेव्हां उत्तर दिलें कीं, ' आपण करवीरास जाण्याचा बेत रहित केला असें म्हटलें म्हणजे मी खालीं बसेन. आपण सर्वजण करवीरास जात असाल तर माझें तरी येथें काय आहे ? मीहि आपल्याबरोबर येतों. कालच्या गोष्टीबद्दल इतका राग येईल असें मला वाटलें नाहीं; तसें असतें तर ही भानगडच केली नसती.' वगैरे पुष्कळ शब्दांनीं त्यांची समजूत पडावी व मन शांत व्हावें म्हणून खटपट केली; पण मामंजींनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. नऊ वाजून गेले तरी प्रातर्विधीसुद्धां उरकला नव्हता व त्या दिवशीं कचेरीलाहि सुट्टी नव्हती. तरी मामंजी कांहीं बोलले नाहींत, पण बाळंभटजी पुढें येऊन मामंजींना म्हणाले कीं, ' आपल्या सांगण्याप्रमाणें गाड्या ठरविल्या आहेत, आतां येतील. '

हें ऐकून व आपण इतका वेळ विनवणी करीत असून भाऊसाहेब कांहींच उत्तर देत नाहींत, असें पाहून स्वतःला फार वाईट वाटलें व पुनः बाळंभटजीकडे पाहून म्हटलें कीं, ' शेवटीं जाण्याचा बेत ठरला ना, मला येथें ठेवून सर्व मंडळी जाणार ! माझी आई गेली त्याच दिवशीं मी पोरका झालों आहे. ' असें म्हटल्यावर तेथें उभें राहवलें नाहीं. एकदम माडीवर जाणें झालें.

कांहीं वेळ गेल्यावर बाळंभटजींला वर बोलावून नेऊन त्यांच्या हातीं मामंजींना असा निरोप पाठविला कीं, ' आपण कोल्हापुरास जाण्याचा बेत रहित करीत नसाल तर मीहि राजीनामा लिहिणार आहे. ' हा निरोप बाळंभटजींनीं मामंजींजवळ सांगितल्यावर, आधींच स्वतःचें माडीवर जाणें झाल्यापासून मामंजींच्या मनाला कसेंसेंच वाटत होतें, त्यांत हा निरोप ऐकून फारच वाईट वाटलें व त्यांनीं एकदम सांगितलें कीं, ' मी कोल्हापुरास जात नाहीं; बेत रहित केला आहे; तर आतां स्नानास उठावें. कोर्टाची वेळ झाली असें वर जाऊन सांगा. ' हा निरोप ऐकून स्वतःच्या मनाला

इतका वेळ वाईट वाटत होतें तें थोडें कमी होऊन हुशारी वाटली. नित्यक्रमाला आरंभ झाला. पुनः स्वतः तशी वेळ कधींहि येऊं दिली नाहीं. ''

माधवरावांची पितृभक्ति या प्रसंगावरून उघड होते व त्यांनीं आपल्या वडिलांस संतोष देण्यासाठीं प्रत्यक्ष आपल्या आवडत्या तत्त्वावर निखारा ठेविला असेल हें मनाला पटूं लागतें. याच वेळीं माधवरावांनीं पुणें येथें असलेला त्यांचा वाडा खरेदी केला व त्यांचे वडील नको नको म्हणत असतांहि, माधवरावांनीं त्यांचेंच नांवें या घराचें खरेदीखत केलें होतें. यानंतर थोडक्यांच दिवसांत गोविंदराव कोल्हापुरास गेले. पण करट झाल्याचे निमित्तानें ते आजारी पडले. हें कळतांच माधवराव रजा घेऊन कोल्हापुरास गेले व आपल्या पित्याच्या सेवेंत मग्न झाले. थोडक्याच दिवसांत रजा संपली, पण अजून प्रकृतीला आराम नव्हता, म्हणून अधिक रजा घेण्याच्या उद्देशानें माधवराव पुण्यास आले. रजा मंजूर होण्यास थोडा अवधी लागला. येवढ्यांतच त्यांचे वडील वारल्याची तार आली. ता. २० फेब्रुआरी १८७७ रोजीं ते स्वर्गवासी झाले. माधवराव स्वभावानें इतके हळवे होते कीं, ही तार येतांच कोल्हापूर येथें ते गेलेच नाहींत. कोणी याबद्दल त्यांना विचारल्यावर त्यांनीं उत्तर केलें, "यापुढें होणारा प्रसंग मला बिलकुल पाहवणार नाहीं व सहनहि होणार नाहीं...म्हणून न गेलेलेंच बरें. '' अर्थात् पुढें त्यांनीं वडिलांचें दणेपाणी फेडून सर्व खटलें पुणें येथेंच आणलें.

अगदीं याच प्रसंगीं महाराष्ट्रांत पडलेल्या दुष्काळानें माधवरावांच्या मानसिक त्रासांत मोठीच भर पडली. या दुष्काळामुळें लोकांचे अतोनात हाल झाले. अनेक लोक मृत्युमुखीं पडले, अनेकांनीं स्थलांतर केलें व साऱ्या महाराष्ट्रभर हलकल्लोळ माजला. सार्वजनिक सभा हें एक जिवंत सामर्थ्य आहे, ही गोष्ट या दुष्काळांतील तिच्या

कार्यानें पुन्हा एकदां सिद्ध झाली. नुसते पोकळ ठराव करून सभा स्वस्थ बसली नाहीं, तर सभेतर्फे पुष्कळ लोक दुष्काळग्रस्तांच्या वस्तींत जाऊन त्यांची स्थिति अवलोकन करूं लागले.

## दंग्याचा रिपोर्ट

दुष्काळ संपून जिकडे तिकडे लोक पुन्हा सुखी झाल्यावर व सरकारचा जीव भांड्यांत पडल्यावर सार्वजनिक सभेच्या दंग्याच्या रिपोर्टाचे निमित्तानें माधवरावांनीं पुन्हा एकदां आपली भेदक बुद्धी व सरकारची चुकीची विचारसरणी सर्वांना पटवून दिली. ‘ अवर्षणानें पिकें बुडालीं व धान्याचा दुष्काळ पडला, ही सरकारची समजूत चुकीची आहे. दुष्काळ धान्याचा नव्हता, संपत्तीचा होता. खंडोगणती मुबलक धान्य इतर प्रांतांतून येत असतांहि, लोक अन्नाला महाग झाले होते, याचें कारण लोकांचें निस्सीम दारिद्र्य. पाऊस वेळेवर पडला तर कर्ज काढून कां होईना शेतकऱ्यांना जेमतेम गुजारा करतां येतो, पण पावसानें फसविलें कीं, शेतांप्रमाणेंच कुणब्याच्या तोंडाला कोरड पडते व अन्नान्न करीत मरण्याखेरीज दुसरी गति रहात नाहीं. हाड्या रोगाप्रमाणें कंगालपणानें शेतकरी लोकांचे घरांत कायम बिऱ्हाड केलें आहे व या कंगालपणाला जबाबदार सरकार आहे’, अशा तऱ्हेनें रोखठोकपणानें सार्वजनिक सभेमार्फत माधवरावांनीं जाहीर करण्यास कमी केलें नव्हतें.

## दरबार का साम्राज्यवादाचें प्रदर्शन

महाराष्ट्रांतील या दुष्काळानें मन व्यग्र झालें असतां देखील माधवरावांचें लक्ष हिंदुस्थानांतील साऱ्या घडामोडींवर कसें होतें हें पुढील उदाहरणावरून सहज सिद्ध होईल. सन १८७६ सालीं लॉर्ड लिटन हे हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल म्हणून आले होते. याच वेळीं इंग्लंडमध्यें डिझरायली हा साम्राज्यवादी मुख्य प्रधानाचे

जागेवर आरूढ झाला होता. सारी हिंदी जनता व हिंदी राजे-रजवाडे हे मोठ्या एकनिष्ठेनें ब्रिटिश साम्राज्यामागें उभे आहेत हें जाहीर करण्याचे हेतूनें १८७७ चे सुमारास दिल्ली येथें मोठा दरबार भरविण्यांत आला व हिंदी गुलामगिरीचें म्हणजेच राजनिष्ठेचें खुलें प्रदर्शन करण्यांत आलें. याच समयीं राणी व्हिक्टोरिया हिला ' हिंदुस्थानची सम्राज्ञी ' ही पदवी अर्पण करण्यांत आली. ती इंग्लंडची राणी होतीच. पण हिंदुस्थानची सम्राज्ञी या नव्या किताबानें ब्रिटिशांची साम्राज्यतृष्णा हिंदी जनतेला दाखवून तुम्ही आमचे गुलाम आहांत, फार काय हिंदुस्थानांतील असंख्य राजे-रजवाडेसुद्धां ' जित ' म्हणून आमचे पुढें नमले पाहिजेत असेंच त्यांना उद्घोषित करावयाचें होतें. महाराष्ट्रांत दुष्काळाचा कल्लोळ उठला असतां तिकडे हिंदुस्थान सरकार या दिल्ली दरबाराचा वैभवरंग उधळण्याच्या आनंदोत्सवांत निमग्न होतें.

**मानपत्र**

वास्तविक १८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या अपयशानंतर हिंदुस्थानांतील अधिराज्य ताब्यांत घेतांना राणीच्या जाहिरनाम्यान्वयें इंग्लंडच्या पार्लमेंटनें ' तुमचे सर्व जुने करारमदार कायम ठेवूं ' असें वचन दिलें होतें. पण मध्यंतरींच्या काळांत मिळालेल्या मोठमोठ्या यशानें इंग्लंडला साम्राज्याची धुंदी आली होती. म्हणूनच वीस वर्षांचे आंत हें दिलेलें वचन मोडावयास साम्राज्य-सरकार सिद्ध झालें होतें. साम्राज्यवाद्यांचें हें उघडें नागडें स्वरूप ताबडतोब माधवरावजींनीं ओळखलें. हा प्रसंग सुना जाऊं न देतां आपणातर्फेंहि त्यांना कांहींतरी सुनवावयाचें असें त्यांनीं ठरविलें. या दरबारप्रसंगीं राणीसरकारला पुणें सार्वजनिक सभेमार्फत मानपत्र द्यावयाचें त्यांनीं योजिलें; व या मानपत्राबरोबरच त्यांनीं हिंदी कारभाराबाबत आपल्या कांहीं मागण्या सरकारपुढें

ठेवावयाचें ठरविलें. वास्तविक दरबारचा प्रसंग हा मोठा आनंद प्रसंग. अशा वेळीं हें मागण्यांचें रडगाणें कशाला असा प्रश्न कांहीं जणांनीं काढला. पण या मागण्यांचा परिणाम फार दूरवर जाणार अशी माधवरावांची खात्री होती, म्हणूनच मोठ्या कसोशीनें आणि कष्ट घेऊन त्यांनीं मानपत्राचा मसुदा तयार केला, व सार्वजनिक काकांना दरबारांत हजर राहण्यास पाठवून त्यांचेमार्फत हें मानपत्र तेथें वाचून दाखविलें. येवढ्यावरच काका थांबले नाहींत तर तेथें जमलेल्या राजेरजवाड्यांना उद्देशून त्यांनीं तेथें एक प्रसंगोचित भाषणहि केलें.साम्राज्याचें वैभव दाखविण्यासाठी केलेल्या त्या भव्य दरबारांत खादीवेषधारी काकांचें मानपत्रवाचन व मागाहून केलेलें भाषण ही गोष्ट सर्वांना अगदींच चमत्कारिक वाटली असेल नाहीं ?

माधवरावांनीं पाठविलेला हा अर्ज आज पासष्ट वर्षांनंतराहि अत्यंत महत्त्वाचा असा वाटेल. बंडानंतर अवघ्या वीस वर्षांनींच हिंदी राजकीय आकांक्षांचें उत्तम चित्र या अर्जांत रेखाटलें गेलें आहे तें पहाण्याजोगें आहे. यांतील अखिल भारतीय ऐक्याची, व हिंदी पार्लमेंटची कल्पना, व अन्य तऱ्हेनें हिंदी पुढाऱ्यांना सूचित केलेली राष्ट्रीय सभेची कल्पना पाहतां माधवरावांची दूरदृष्टि व राजकारण-पटुत्व मनाला चांगलेंच पटतें. या मानपत्रांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे.

" भारतीय सम्राज्ञींच्या चरणीं विदित असो कीं, आम्ही खालीं सह्या करणारे पुण्याचे व महाराष्ट्राचे रहिवाशी या प्रसंगीं आपलें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों. ब्रिटिश तख्ताच्या अंकित असलेल्या आमच्या देशांत गेलीं वीस वर्षें अखंड शांतता नांदत आहे. सर्व देशभर सुधारणांचें जाळें पसरून देशांत एकराष्ट्रीयत्वाची भावना जोरानें वाढत आहे. त्यामुळें आपलें राज्य सर्वांना प्रिय होत आहे.

पण आपल्या या नव्या पदवीधारणाच्या समारंभानें आमच्या मनांत एक किंतु आला आहे. इंग्लंडच्या व आयर्लंडच्या राणीचे प्रजाजन व आम्ही भारतीय सम्राज्ञींचे प्रजाजन यांमधील समता या पदवीनें नष्ट होत नाहीं काय? कांहीं महत्त्वाच्या राजकीय कारणांमुळें ही पदवी आपणांस दिली गेली असली तरी, आपल्या कारकीर्दींत स्वातंत्र्याच्या संस्था व योग्य न्याय यांची प्रगतीच होईल. अशी आम्हांस खात्री वाटते; व म्हणूनच आम्ही आपल्या या नव्या पदवीचें स्वागत करतों.

हिंदी लोक हे जात्या पुराणप्रिय आहेत. राज्यारोहण किंवा नवीन पदवीसमारंभ वगैरे प्रसंगीं कांहीं नवे हक्क प्रजेला मिळावेत अशी त्यांची अपेक्षा असते. ही सनातन रूढी आम्हीं आपल्या नजरेस आणतों व आमच्या मागण्या सविनय सादर करीत आहों. अशाकरितां कीं त्यामुळें शांतता, प्रगति व स्वतंत्र शासनसंस्था यांच्या विजयाचें प्रतीक म्हणून हा प्रसंग स्मरणीय व्हावा."

असा प्रस्ताव करून या अर्जांत खालील मागण्यांचा स्पष्ट निर्देश करण्यांत आला आहे-

## हिंदी राजकीय आकांक्षा

"(१) इंग्रजी वर्तमानपत्रांतून चालू असलेल्या चर्चेवरून आम्हांला आशा वाटते कीं,ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्यव्यवस्थेंत हिंदी राजेरजवाड्यांचें सहाय्य यापुढें वाढत्या प्रमाणांत घेतलें जाईल. तसेंच त्यांच्या संस्थानांतून पोलिटिकल एजंट ठेवण्याचें धोरण सोडून दिलें जाईल; व मध्यवर्ती सत्तेशीं त्यांचे संबंध जास्त सलोख्याचे करून राज्यकारभारांत त्यांचा सल्ला घेतला जाईल. तसेंच असेंब्लीसारखी संस्था निर्माण करून तेथें ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानिक यांच्यांत चर्चा व विचारविनिमय घडवून आणतां येईल, अशा प्रकारच्या सुधारणा करण्याची आतां वेळ आली आहे.

( २ ) संस्थानें खालसा करण्याचें बंडापूर्वीचें धोरण यापुढें अंमलांत येणार नाहीं असें आश्वासन मिळणें जरूर आहे.

( ३ ) आपल्या राज्यांत हिंदी आकांक्षांना अत्यंत आकुंचित क्षेत्रांत दाबून टाकण्यांत आलें आहे. यामुळें लोकांत निराशेचें वातावरण पसरलेलें आहे. यापुढें तरी आमच्या लोकांना लष्करी व मुलकी खात्यांत अधिक प्रवेश मिळून हिंदी महत्त्वाकांक्षेला अधिक वाव दिला जाईल अशी आशा आहे. सिव्हिल सर्व्हिसमधेंहि जास्त उदारपणाचें धोरण स्वीकारलें जावें, अशी विनंती आहे.

( ४ ) यापुढें पार्लमेंटच सर्वसत्ताधीश असल्यामुळें पार्लमेंटपुढें खरी वस्तुस्थिति मांडली जाणें इष्ट आहे. या दृष्टीनें हिंदी प्रतिनिधींना पार्लमेंटमधें बसूं देणें शक्य करावें अशी विनंती आहे.

( ५ ) हिंदी कायदेमंडळांत मोठ्या प्रमाणावर सुधारणा होणें जरूर आहे. सरकारनियुक्त सभासदांची संख्या फारच अल्प करावी. ही घटना उदारपणाची व सध्यांच्या काळाला योग्य अशी बनवणें जरूर आहे.

( ६ ) सर्व हिंदुस्थानला कायमधारा–पद्धति लागू करून आजचा प्रसंग एकमेवाद्वितीय करून ठेवावा अशी आमची विनंती आहे.

( ७ ) हिंदी राष्ट्रीय कर्जाचें एकीकरण करून त्याच्या फेडीबद्दल ब्रिटिश सरकारनें हमी द्यावी."

अशा मागण्या पुढें मांडून पुढीलप्रमाणें त्या अर्जाचा समारोप करण्यांत आला होता.

" हिंदी राज्यकारभाराची सुधारणा आम्हाला कशी हवी आहे याचें हें दिग्दर्शन आहे. सम्राज्ञी पदवी धारण करण्याचे प्रसंगीं हिंदी लोकांना नवे राजकीय हक्क देऊन या राष्ट्रांतील राज्य-संस्थांच्या विकासाच्या नव्या युगाला आरंभ करा. हिंदी

लोकांना ब्रिटिश राष्ट्राच्या बरोबरीचा राजकीय व सामाजिक दर्जा प्राप्त करून द्या आणि जबाबदारीचे हक्क उपभोगून हिंदी लोकांना स्वावलंबी व पुरुषार्थी बनण्याचें शिक्षण द्या. आपण 'सम्राज्ञी' हा किताब घेतला ही गोष्ट आम्हांस भविष्यत्काळांत प्राप्त होणाऱ्या व आपणापाशीं सांठवून ठेविलेल्या आमच्या सुखाच्या ठेव्याचें पूर्व चिन्हच होय असें आम्ही समजतों. याचकरतां ईश्वराजवळ आमची प्रार्थना आहे कीं, आपणांला दीर्घायुष्य लाभो व इंग्लंड आणि हिंदुस्थान यांच्यामध्यें उत्पन्न झालेले वात्सल्याचे संबंध वाढत जावोत. ''

अशा तऱ्हेनें माधवरावजींनीं या अर्जाबरोबर सनदशीर व प्रागतिक राजकारणाची सुरवात जवळजवळ पासष्टवर्षांपूर्वी करून ठेवली आहे. त्यांच्या असामान्य बुद्धिमत्तेचा प्रभाव असा कीं त्यांनीं केलेला हा अर्ज आजहि आपल्याला अत्यंत महत्त्वाचा वाटेल. राजकारणामधील एकहि अंग असें नाहीं कीं ज्याचा या वरील अर्जांत समावेश होणार नाहीं. माधवरावजींची बुद्धि आणि अभ्यास चौफेर असल्यामुळें राष्ट्रीय कर्जापासून तो तहत मुलकी व लष्करी नोकऱ्यांपर्यंत सर्व प्रश्नांची चर्चा या अर्जात आलेली आहे.

## नाशकास बदली

अशा रीतीनें केवळ सहा वर्षांचे अवधींत पुणें शहराच्या राजकीय जीवनांत जी क्रांति झाली ती सर्वांच्याच डोळ्यांत भरण्याजोगी होती. कुणाचे डोळे या क्रांतीमुळें उघडले जात होते, तर कुणाचे खुपूं लागले होते. घड्याळाचें एक मध्यवर्ति चाक फिरूं लागावें आणि क्षणार्धांत आंतील लहानमोठीं सर्वच चाकें चालू लागून घड्याळाची नेहमींची टिकटिक चालू व्हावी; त्याप्रमाणें साऱ्या महाराष्ट्राचें या सात वर्षांचे अल्पावधींत झालें होतें. साऱ्या महाराष्ट्रांत जिवंतपणा भासूं लागण्यास सुरुवात झाली होती. पण या जिवंतपणाचें

तेज ज्यांचे डोळ्यांत खुपत होतें त्या सरकारला ही गोष्ट अधिक काळ पहावेना. माधवरावांस पुणें येथें येऊन सात वर्षें झालीं, एकाद्या सबॉर्डिनेट जज्जाला पांच वर्षांपेक्षां अधिक दिवस एकाच जागीं ठेवणें बरें नव्हे, अशा सबबीवर सरकारनें माधवरावांची नाशिक येथें बदली केली. पुणें हें महाराष्ट्राचें केंद्र. पुणें येथें मोठ्या प्रमाणावर चळवळी झाल्या कीं लगेंच त्या साऱ्या देशभर फैलावतात हें सरकारनें ओळखलें होतें, व गेल्या सात वर्षांत पुण्यामध्यें ज्या लहानथोर चळवळी झाल्या, त्यांची प्रेरणा पुणेंकरांना कोठून मिळाली हेंहि सरकार ओळखून होतें. तेव्हां पुणेंकरांची ही प्रेरक शक्तीच येथून उचलून न्यावी असा सरकारचा बेत या बदलीमागें होता; ही बातमी पुणेंकरांस समजतांच त्यांना काय वाटलें. असेल हें कल्पनेनेंच जाणणें बरें.

स. १८७८ च्या जानेवारींत माधवराव नाशकास जाण्यास निघाले. पुणेंकरांनीं त्या वेळीं दुःखद अंतःकरणानें माधवरावांना निरोप दिला. परंतु तेथें जातांच थोडक्याच दिवसांत रजा घेऊन ते परत पुण्यास आले. पुण्यास येतांच विषमज्वरानें ते आजारी पडले. चारदोन दिवसांत त्यांचें आजारीपण विकोपास जाऊन यांतून ते उठतात कीं नाहीं अशी शंका सर्वांना येऊन गेली आणि या बातमीनें साऱ्या पुणेंकरांचीं तोंडें काळवंडून गेलीं. पुण्याच्या सात वर्षांच्या कारकीर्दींत माधवरावांनीं अनेक मित्र आणि चहाते आपले भोंवतीं गोळा केले होते. त्यांना विरोध करून त्यांचें शत्रुत्व करणारे लोकहि पुण्यांत नव्हते असें नाहीं. विधवाविवाह प्रकरणांत, दयानंद प्रकरणांत अनेकांनीं माधवरावांवर तोंडसुख घेण्यास कमी केलें नव्हतें. पण माधवरावांचें व्यक्तिमत्त्व येवढें विशाल होतें कीं, त्यांचा व्यक्तिशः कधींच कोणी द्वेष केला नाहीं. त्यांची पुण्याहून बदली झाल्यावर आणि त्यांच्या या आजारीपणांत त्यांच्या

शत्रूंचींहि तोंडें चिमणीएवढीं झालीं होतीं हें खरें. सात्त्विक आणि प्रेमळ स्वभावानें माधवरावांनीं आपल्या कट्टया शत्रूंनासुद्धां जिंकलें होतें.

## नाशिक येथील चळवळी

जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं असें म्हणतात. तद्वतच सार्वजनिक कामाचें असतें. सरकारनें पुण्याहून नाशकास आणलें तरी नाशकास येतांक्षणींच माधवरावांनीं तेथेंहि सार्वजनिक कार्यास सुरवात करून नाशकांत चेतना उत्पन्न केली. सभा भरवावयाच्या, लोकांना एकत्र करून व्याख्यानें द्यावयाचीं या गोष्टी नाशकासहि चालू झाल्या. येथें माधवरावांनीं एक वाचनालय काढलें. पुण्याप्रमाणें येथेंहि टाउन हॉल बांधावयाच्या कल्पनेस चालना दिली. आपल्या आवडत्या प्रार्थनासमाजाची स्थापना करण्याबद्दल तेथील लोकांत विचारविनिमय सुरू केला. पण नाशिक म्हणजे सनातनी लोकांचे दक्षिणेंतील एक मोठें पीठच. अर्थात् तेथें प्रार्थनासमाजाबद्दल माधवरावांचे विचार आणि त्यांचे इतर धार्मिक बाबतींतील पुढारलेले विचार लोकांना पटणें शक्यच नव्हते. ‘ माधवराव स्वधर्माविषयीं अनादरानें बोलतात हें वाईट आहे ’ अशा तऱ्हेचे आक्षेप निघूं लागले.पण त्याचा फारसा उपयोग झाला नाहीं.याच वेळेस माधवरावांनीं एक अतिशय सुंदर योजना महाराष्ट्रापुढें मांडून एका अगदीं नव्याच प्रश्नाला चालना देण्याचें श्रेय घेतलें. एकादी ‘ मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी ’ काढून त्यामार्फत इतिहास, शास्त्रें देशाची सुधारणा, सन्मार्गवर्तीचीं चरित्रें, धर्म, उपयुक्त कथा अशीं नानाविध पुस्तकें प्रसिद्ध करण्याची कल्पना माधवरावांनीं जाहीर केली.अगदीं याच वेळीं सार्वजनिक काका कलकत्त्यास वृत्तपत्र-कारांचें संमेलन भरविण्याच्या खटपटींत होते. पुढें हें संमेलन

यशस्वी करून सार्वजनिक काका पुण्यास परत येतांच मुंबईसहि त्यांनीं असेंच एक संमेलन भरविलें. हीं संमेलनें भरविण्याची कल्पना कांहीं उगीच उत्सव करण्यासाठीं निघाली नव्हती. सरकारनें वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करण्याचा प्रयत्न सुरू केला होता व त्याला वृत्तपत्रांतर्फे उत्तर देणें अवश्य होतें. अशा उत्तराच्या भरीवपणासाठीं वृत्तपत्रकारांमध्यें एकजूट घडवून आणणें अत्यंत जरूर होतें. हेंच कार्य सार्वजनिक काकांनीं करण्यास सुरुवात केली. याहि कल्पनेचे प्रेरक माधवरावच असावेत असें अनुमान काढावयास कांहीं हरकत नाहीं. कारण नाशकाच्या बदलीमुळें सरकारनें त्यांना पुणें येथें राहणें बंद केलें असलें, तरी पुण्याच्या सार्वजनिक सभेला सल्ला देणें बंद करावयास लावणें सरकारला शक्य नव्हतें. तसेंच उन्हाळ्याच्या सुट्टींत माधवराव पुणें येथें येत असतच, व मग सबंध महिनाभर विश्रांतिऐवजीं सार्वजनिक कामाचा डोंगरच त्यांचेपुढें पडलेला असे. हें काम म्हणजे कोणी दिलेलें ओझें असें माधवरावांना कधींच वाटत नसे. उलट मोठ्या आनंदानें व उत्साहानें तेही कामें करीत; त्यामुळें त्यांना या कामाचा कधींहि शीण वाटत नसे. वसंत-व्याख्यानमाला व वक्तृत्वोत्तेजक सभा अशा व्याख्यानांची या वेळीं पुण्यांत मोठी दंगल माजून राही; आणि अशा प्रसंगांतील माधवरावांचीं व्याख्यानें म्हणजे पुणेंकरांना एक पर्वणीच वाटत असे.

## फडक्यांचें बंड

सन १८७९ च्या मे महिन्यांत अशाच निमित्तानें माधवरावांचा मुक्काम पुणें येथें होता. नेहमींप्रमाणें कार्यक्रम चालत असत. पण या वेळेस नेहमींप्रमाणें मंडळींना मोकळेपणा वाटत नव्हता. त्याला कारण म्हणजे ‘ वासुदेव बळवंत फडके’ यांचें बंड. याच वर्षी

मार्चपासून दुष्काळ पडला होता. त्यामुळें आधींच सारी जनता गांजून गेली होती. त्यांतून वासुदेव बळवंतांच्या व त्यांना पुढें करून इतर कांहीं संधिसाधु दरोडेखोरांनीं घातलेल्या दरोडयांमुळें जनता हवालदील झाली होती. वासुदेव बळवंतांचें बंड हें प्रचलित सरकार उलथून पाडण्यासाठीं झालेलें असून त्याला पुणेकरांची, विशेषतः माधवरावांसारख्यांची अंतःस्थ मदत आहे असा कांहीं सरकारी अधिकाऱ्यांनीं आपला ग्रह करून घेतला होता. आणि या ग्रहाचा वास माधवरावांपर्यंत आला होता. यामुळेंच माधवराव सुट्टीच्या वेळेस जरा उद्विग्न झाले होते.

## पेशव्यांचे वाड्यांस आग

या उद्विग्नपणांत ता. १३ मे १८७९ रोजीं मध्यरात्रीं चांगलीच भर पडली. मंगळवारचा दिवस होता तो. दुपारीं अचानकपणें वळवाचा पाऊस पडून मोठेंच वादळ निर्माण झालें होतें. धो धो पावसानंतर तें वादळ निवळलें. जिकडे तिकडे गारीगार झालें. सारें पुणें शहर रात्रीच्या गाढ झोपेंत निमग्न होणार, इतक्यांत साऱ्या शहरभर हलकल्लोळ उठला, बुधवार वाडा पेटला–बुधवार वाडा पेटला! नुकत्याच अस्तंगत झालेल्या पेशव्यांचें तें शेवटचें स्मारक अशा रीतीनें अग्निनारायणाच्या भक्ष्यस्थानीं पडूं लागलेलें कोणाला पाहवणार? सारे लोक आग विझवावयास धांवले, तोंच विश्रामबाग वाडा पेटल्याची वार्ता सर्वांच्या कानांवर येऊन आदळली आणि त्यामुळें बुधवार वाड्याभोंवतीं जमलेल्या लोकांचा घोळका विश्रामबाग वाड्याकडे लोटला. पेशव्यांच्या या दोन वाड्यांची एका रात्रीं झालेली राखरांगोळी पाहून कित्येक पुणेंकरांच्या डोळ्यांचें पाणी कित्येक दिवस खळलें नव्हतें. या दोन वाड्यांना लागलेल्या आगीनें पुणें शहराचा पुष्कळसा भाग भस्मसात् झाला

असता. पण आग विझविण्याबाबत लोकांनीं अतोनात प्रयत्न केल्यामुळें तसा अनवस्था प्रसंग ओढवला नाहीं. तरी पण या दोन्ही वाड्यांची मात्र संपूर्णतया राखरांगोळी झाली.

## आग भोंवली

या आगीपासून कांहीं सरकारी अधिकाऱ्यांचे मनांतील संशय-पिशाच्चानें थैमान घालण्यास सुरवात केली. महाराष्ट्रांतील सुशिक्षित-पुढाऱ्यांचा मोठा कट चालू असून इंग्रज राज्य उलथून टाकण्याचा त्यांचा जारीनें प्रयत्न सुरू आहे असा प्रचार त्यांनीं सुरू केला. माधवरावजींना तर ही आग बरीच भोंवली. कारण चौकशीअंतीं कोणा रानडे नांवाच्या माणसानेंच ही आग लावली असें आढळून आलें. या नामसादृश्याचा फायदा घेऊन अँग्लो-इंडियन वृत्तपत्रांनीं माधवरावजींवर वाटेल तसे बेशरम आरोप करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. पुढें अधिक चौकशी होतांच हा रानडे अगदीं निराळा माणूस असून सरकारी नोकरींत त्यानें केलेल्या पैशाचे अफरा-तफरीचे कागदपत्र जाळण्यासाठीं त्यानें ही आग लावली हें सिद्ध झालें. तरी पण या प्रकरणानंतर आठच दिवसांनीं, ' हुकूम पाहतांच सुट्टी संपण्याची वाट न पाहतां धुळ्यास जाऊन फर्स्टक्लास सबजज्जाचा चार्ज घ्यावा ' असा माधवरावांना हुकूम आला. या वेळींहि पुणेंकरांना आणि त्यांचे मित्रांना अतिशयच वाईट वाटलें. 'सरकार तुमचा उगीचच छळ करीत आहे, तुम्ही धुळ्यास जाऊं नका ' असें माधवरावांना कित्येक मित्रांनीं सुचविलें. पण माधवरावांनीं कोणाचेंच कांहीं ऐकलें नाहीं. ते तडक उठून धुळ्यास गेले.

## टपाल-सेन्सॉर

धुळ्यास जातांच सुरवातीस सरकारी अवकृपेचा चांगलाच तडाखा त्यांना बसला. त्यांचें टपाल वेळेवर मिळेनासें झालें. जें मिळे

तें फोडलेलें असावें, असें चक्क दिसून येई. आणि याशिवाय कित्येक न फोडलेलीं पत्रें येत. पण तीं बहुतेक दरोडेखोरांकडून माधवरावांना सल्लामसलत विचारण्याचे निमित्तानें आलेलीं असत. अर्थात् अशीं पत्रें माधवराव जशींच्या तशीं पोलिसाच्या हवालीं करीत. हा क्रम सुमारें दोन महिने चालला होता. येवढ्या काळांत वासुदेव बळवंतांना पकडण्यांत येऊन त्यांचेवर खटला भरण्यांत आला होता. या चौकशींत त्यांच्या बंडाशीं वा दरवडयांशीं माधवरावांचा कसलाहि संबंध नव्हता हें उघडकीस आलें. त्यामुळें सरकारचे डोळे खाडकन् उघडले. धुळ्याचे दुय्यम कलेक्टर एके दिवशीं जातीनें माधवरावांच्या घरीं आले व त्यांनीं टपालावर नजर ठेवल्याबद्दल माधवरावांजवळ दिलगिरी प्रदर्शित केली.

## सार्वजनिक काकांचा मृत्यु

सन १८८० सालीं माधवरावांच्यावर एक मित्रवियोगाचा दुःखद प्रसंग आला. तो म्हणजे सार्वजनिक काकांचें निधन होय. सन १८७१ सालीं पुण्यास आल्यापासून माधवराव व काका यांची सांगड इतकी उत्तम जमली होती कीं, कोठलेंहि सार्वजनिक हिताचें काम असो त्यांत काकांचें काम प्रामुख्यानें दिसून यावयाचेंच. व अर्थात् त्यांना माधवरावांपासून प्रेरणा मिळावयाची, हेंहि उघडच होतें. सार्वजनिक सभेमार्फत तर काकांनीं प्रचंड लोककार्य केलें होतेंच, पण मृत्युपूर्वी थोडे आधीं त्यांनीं दाखविलेल्या एका प्रसंगांतील धडाडीनें सारें पुणें स्तिमित झालें होतें. तो प्रसंग म्हणजे वासुदेव बळवंतांचा खटला. वासुदेव बळवंतांना पकडून सरकारनें त्यांच्यावर खटला भरला. अगोदरच या प्रकरणामुळें साऱ्या पुणेंकरांचा असह्य छळ चालला होताच, त्यांतून कांहीं लोकांच्या कपाळीं फडक्यांशीं संबंध ठेवला म्हणून असह्य भोग

आलेला दिसत होता. अशा स्थितींत फडक्यांचें वकीलपत्रहि घ्याव-यास कोणी तयार होईना. पण सार्वजनिक काका कशाचीहि पर्वा न करतां फडक्यांचें वकीलपत्र घेण्यास पुढें आले ' फडके हेहि एक देशभक्त आहेत. त्यांच्या देशभक्तीला विचारांचें व तारतम्याचें जाड बूड नसल्यानें त्यांनीं बंडें केलीं व दरवडे घातले.पण म्हणून त्यांच्या या कृत्यानें त्यांच्या मनांतील भावनेची किंमत कमी होत नाहीं. ' असें काकांनीं सांगून त्यांचें वकीलपत्र घेतलें. 'तुमच्या धाडसाचा परिणाम फार वाईट होईल ' असा इशारा कोणीतरी त्यांना दिल्यावर त्यास काकांनीं ताडकन् उत्तर दिलें होतें, " काय होईल ? येऊन जाऊन सरकार रागावण्याची भीति येवढेंच ना? पण सरकार रागावलें तरी ज्यास्तींत ज्यास्त करणार काय ? वासुदेव बळवंता-बरोबर या गणेश वासुदेवाला फांसावर लटकावील. यापेक्षां काय करूं शकणार सरकार? " काकांच्या वकिलीनें वासुदेव बळवंतांना देहान्ताची शिक्षा न मिळतां जन्मठेपेची शिक्षा मिळाली होती. अशा तऱ्हेनें या प्रसंगानें काकांचे अंगची उदात्त देशप्रेमाची भावना सर्वांना दिसून आली होती. त्यांचे मृत्यूनंतर त्यांचें स्मारक म्हणून आजची सार्वजनिक सभेची इमारत उभारण्यांत आली.

## मुंबईस बदली

सन १८८१ चे मार्च महिन्यांत माधवरावांची धुळ्याहून प्रथम मुंबईस प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटचे जागीं बदली झाली. यापूर्वी एकच वर्ष ठाण्याच्या सेशन जज्जाची जागा रिकामी झाली होती. वास्तविक या जागीं माधवरावांची नेमणूक करावी असें हायकोर्टानें सुचविलें होते. पण सरकारनें मुद्दाम त्यांना गाळून दुसऱ्यालाच त्या जागीं नेमलें होतें. पुढें हायकोर्टाचे त्या वेळचे चीफ जस्टिस सर मायकेल वेस्ट्रॉप यांनीं तेलंगांमार्फत माधवरावांना निरोप पाठवला कीं,

'तुमचे लेख तुमच्या बढतीआड येतात. तेव्हां आपणांस बढती हवी असेल तर असले उपद्व्याप बंद करा.'

या निरोपाला माधवरावांनीं तत्काल एक सडेतोड उत्तर तेलंगांकडे पाठविलें. — "मी साहेबांचा आभारी आहे. साहेबांस कळवा कीं मी अल्पसंतुष्ट आहे. मला थोडक्यांत निर्वाह करतां येतो, पण जें सत्य दिसतें तें माझ्या देशहितार्थ मला सांगितलेंच पाहिजे."

## परत पुणें येथें

जरी प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट म्हणून माधवराव मुंबईस आले तरी ही बदली फक्त तीन महिन्यांपुरतीच होती. सन १८८१ सालांतच पुणें येथें पूर्वींच्याच म्हणजे सदर अमीनच्या जागीं माधवरावांची बदली करण्यांत आली व अशा तऱ्हेनें माधवराव परत पुणें येथें आले. अर्थात् पुणें येथें येतांच सर्व तऱ्हेच्या सार्वजनिक कार्यांमध्यें भाग घेऊन समाजाची सर्वांगीण उन्नति करण्याचें आपलें धोरण माधवरावांनीं सुरू केलें.

## पुण्याचें फीमेल हायस्कूल

सन १८८२ मध्यें पुण्याचें फीमेल हायस्कूल माधवरावांच्या व त्यांच्या अनेक स्नेहीमंडळींच्या प्रयत्नानें स्थापन करण्यांत आलें. डॉ. भांडारकर, मोडक, वगैरे त्यांचे मित्र या कामांत मदतनीस होतेच. पण श्री. शंकर पांडुरंग पंडित यांचे श्रम या कामीं विशेष होते. याच वर्षीं ऑगस्टमध्यें सरकारकडे विनंतीपत्रक गेलें. सप्टेंबर मध्यें दसऱ्याचे मुहूर्तावर शाळा स्थापन करण्यांत आली. सरकारी अधिकारी आणि संस्थानिक मदतीस असल्यावर काय कमी होतें! सध्यांची हुजूरपागेची इमारत शाळेला देण्यांत आली.

अशा तऱ्हेनें संस्था काढावयाचें ठरल्यापासून अवघ्या दोन महिन्यांचे आंत ती मूर्त स्वरूपास आली व त्यायोगें पुण्यांत स्त्रीशिक्षणाची मुहूर्तमेढ रोंवण्यांत आली.

## डेक्कन एज्युकेशन सोसायटी

फीमेल हायस्कूल निघावयाच्या अगोदर दोनच वर्षें म्हणजे सन १८८० मध्यें न्यू इंग्लिश स्कूल निघालें होतें. पण फीमेल हायस्कूलप्रमाणें ही शाळा एकाद्या संस्थेच्या ताब्यांत समायिक मालकीची नसून, फक्त विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्याच मालकीची होती. सन १८८२ मध्यें झालेल्या त्यांच्या मृत्यूनंतर शाळेच्या मालकीसंबंधांत तंटा उत्पन्न झाला. तेव्हां हा तंटा विकोपाला जाऊं न देतां माधवराव, डॉ. भांडारकर वगैरे लोकांनीं मध्यस्थी करून सन १८८४ सालांत डेक्कन एज्युकेशन सोसायटी स्थापन करण्यांत बरीच खटपट केली.

सदर अमीनच्या जागेवर आल्यानंतर लगेंच चार महिन्यांनीं माधवरावांची परत बदली झाली. पण या वेळीं ती पुण्याबाहेर न होतां पुण्यांतच झाली. यापुढें ते आसिस्टंट स्पेशल जज्ज झाले होते. या कामासाठीं ऑफिससह त्यांना आठ महिने महाराष्ट्रभर फिरावें लागणार होतें. कोर्टाचे कामाबरोबरच अशा तऱ्हेनें अनायासें सारा महाराष्ट्रभर फिरण्याची माधवरावांना चांगलीच संधि मिळाली. या निमित्तानें अनेक लोकांशीं माधवरावांचा संबंध आला. अनेक ठिकाणीं व्याख्यानें देऊन, चर्चा करून, लोकजागृति करण्याची संधि त्यांनीं दवडली नाहीं. चार महिन्यांच्या राहिलेल्या काळांत पुणें येथें राहून असंख्य सार्वजनिक कामाचा व्याप ते संभाळीत असत. मे महिन्यांत आपल्या विद्वत्ताप्रचुर व्याख्यानांचा ते पुण्यांत अक्षरशः पाऊस पाडीत असत. तसेंच

सार्वजनिक सभेमार्फत निघणाऱ्या त्रैमासिकांत त्यांचे गंभीर विषयांची सांगोपांग चर्चा करणारे लेख येत असतच. या त्यांच्या व्याख्यानांनीं आणि लेखांनीं त्यांनीं अनेक वेळां महत्त्वाच्या सामाजिक आणि राजकीय प्रश्नांवर चांगला प्रकाश पाडला; येवढेंच नव्हे तर कित्येक समयीं अगदीं नवे विषय त्यांनीं लोकांच्या दृष्टीपुढें मांडून त्यांना या विषयांवर विचार करावयास लावले.

## काँग्रेसची स्थापना

२८ डिसेंबर सन १८८५ मध्यें काँग्रेसची स्थापना झाली. इतर अनेक पुढाऱ्यांबरोबर या काँग्रेसच्या स्थापनेच्या कार्यांत माधवरावांचें अंग प्रामुख्यानें होतें हें सांगावयास नकोच! फार कशाला माधवरावांची दृष्टि या कार्यावर सारखी लागावी,व त्यांच्या सल्ल्याचा सतत फायदा व्हावा म्हणून पाहिलें अधिवेशन पुणें येथेंच भरविण्याचें ठरलें होतें. पण ऐन वेळीं पुणें येथें कॉलऱ्याची सांथ उद्भवल्यामुळें हा मान मुम्बईस मिळाला. माधवराव सरकारी नोकर असल्यामुळें, व काँग्रेस ही राजकीय संस्था असल्यानें प्रत्यक्षपणें काँग्रेसमध्यें ते भाग घेऊं शकत नव्हते. पण कॉंग्रेसच्या कार्याची एकानिष्ठा माधवरावां-मध्यें किती बाणली होती हें खालील गोष्टीवरून स्पष्ट होण्या-जोगें आहे. या पहिल्याच बैठकीच्या वेळीं, प्रत्यक्ष कामामधें भाग घेणें अशक्य म्हणून माधवराव प्रेक्षकांत बसले होते. सभा चालू असतां इंडिया कौन्सिलच्या प्रश्नावर कांहीं वाद सुरू झाला व हा वाद करतांना अनेक अक्षम्य चुका होऊं लागल्या. आपण डेलिगेट नसून साधे प्रेक्षक आहोत, ही गोष्ट माधवराव विसरून गेलें व चटकन् ते सभास्थानीं येऊन एक छोटेसें भाषण करून गेले सुद्धां. मागाहून मात्र ही चूक त्यांचे लक्षांत आली.

## सामाजिक परिषद्

कॉंग्रेसची तयारी चालू असल्यापासूनच सामाजिक सुधारणा-परिषद्हि कॉंग्रेसबरोबर भरविली जावी अशी माधवरावांनीं खटपट सुरू केली होती. त्याप्रमाणें अनेकांशीं त्यांनीं पत्रव्यवहारहि केला होता. मुंबईच्या कॉंग्रेसच्याचवेळीं सामाजिक परिषदेचा पाया घालण्यांत आला. दि. ब. रघुनाथराव, काशीनाथ त्रिंबक तेलंग वगैरे लोकांचा माधवरावांना या कार्यांत पाठिंबा होता.

## स्थानिक स्वराज्य व कुंटे

याच सालांतील आणखी एकदोन गोष्टी नमूद करण्यासारख्या आहेत. या वर्षीं स्थानिक स्वराज्याचा कायदा अमलांत यावयाचा असल्यामुळें, त्या बाबतींत लोकांत बराच उत्साह उत्पन्न झाला होता. या म्युनिसिपालिट्या म्हणजे राजकीय शिक्षणाच्या प्राथमिक शाळाच होत अशी माधवरावांची मनोमन खात्री असल्यानें, शहरोंशहरींच्या होतकरू मंडळींना माधवरावांनीं येणाऱ्या निवडणुकींत भाग घेण्यास उत्तेजन दिलें होतें. खुद्द पुण्यांत तर काय माधवरावांच्या अस्तित्वानें विशेषच उत्साह दिसून येत होता. पण या कार्यांत माधवरावांना एक नवीनच प्रतिस्पर्धी आढळून आला. त्यांचे आजपर्यंतचे जिवश्चकंठश्च स्नेही महादेव मोरेश्वर कुंटे हाच तो प्रतिस्पर्धी होय. आजपर्यंत माधवराव व कुंटे यांनीं अनेक कार्यांत एकत्र काम केलें होतें. पण या वेळीं कुंटयांना काय लहर आली कोण जाणे! त्यांनीं या स्थानिकस्वराज्याविरुद्ध प्रचार सुरू केला. कुंटे म्हणजे कांहीं सामान्य व्यक्ति नव्हती त्या वेळची. एकादी महांकाळी तोफच ती. कुठल्या गोष्टीवर उलटतील तिचा नायनाटच करून टाकतील अशी शक्ति होती त्यांचेजवळ. माधवरावांना मोठीच पंचाईत येऊन पडली. पेठापेठांतून रोज

कुंटयांचीं व्याख्यानें चाललींच होतीं. एके दिवशीं रास्ता पेठेंत कुंटयांचें भाषण चाललें असतां माधवराव मुद्दाम तेथें गेले. माधवराव आलेले पाहतांच कुंटयांनीं एकदम तोंड वळवलें व श्रोत्यांकडें पाठ करूनच आपलें भाषण सुरू ठेवलें. थोडयाच वेळांत कुंटयांचें भाषण संपलें. घरीं जाताना कुंटयांना माधवराव म्हणाले, 'चला आपण गाडींतून फिरावयास जाऊं.' पण या वेळीं कुंटे होते रागांत. त्यांनीं माधवरावांच्या विनंतीचा अव्हेर केला व ते तडक आपल्या गाडीकडे निघाले. माधवरावाहि कांही कमी नव्हते. ते थेट कुंटयांच्या गाडीजवळ गेले व तिच्यांत बसले. 'तुम्ही माझ्या गाडींतून येणार नसला तरी मी मात्र तुमच्या गाडींतून फिरावयाला येणारच' असा त्यांनीं आग्रह धरिला. कुंटयांचा इलाजच चालेना. अखेर ते दोघे एका गाडींतून फिरावयास गेले. येवढेंच नव्हे तर या वेळच्या संभाषणांत माधवरावांनीं काय जादू केली असेल ती असो, यापुढें स्थानिक स्वराज्याविरुद्ध कुंटयांनीं एकहि व्याख्यान दिलें नाहीं.



## पंडितांचेवर सरकारी रोष

याच वेळीं माधवरावांचे परममित्र शंकर पांडुरंग पंडित यांचेवर उगीचच्या उगीचच सरकारी इतराजीचा प्रसंग आला. शंकर

पांडुरंग पंडित यांनीं हुजूरपागा—मुलींची शाळा—स्थापन करण्याचे कामांत अतोनात कष्ट घेतले होते, ही गोष्ट वर एके ठिकाणीं आलीच



आहे. सन १८८५ मध्यें या फीमेल हायस्कूलच्या वार्षिक समारंभा-निमित्त श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांना अध्यक्ष म्हणून बोलावण्यांत आलें होतें. खुद्द समारंभाचे वेळीं त्यांना आणखी एका ठिकाणीं जाण्याची घाई असल्यामुळें समारंभाचे कार्यक्रमांत थोडी काटाकाट करण्यांत आली. त्यांत चुकून इंग्रजी राजगीतालाहि गाळण्यांत आलें. पण त्या वेळच्या सरकारी अधिकाऱ्यांना या साध्या गोष्टींतहि राजद्रोह दिसून आला. आणि त्यामुळें बिचाऱ्या

पंडितांवर सरकारी रोष ओढवला. पुढें माधवरावांनींच खुद्द व्हाइसरॉय साहेबापाशीं पंडितांबद्दल रदबदली करून त्यांचेवरचा सरकारी रोष काढण्याचा प्रयत्न केला.

## नामदार रानडे

याच वर्षी माधवरावांना कौन्सिलांत नामदारी मिळाली व लगेंच त्या वर्षी ते पुण्याच्या बैठकीला हजर देखील राहिले. पुढील वर्षी त्यांना सरकारनें फायनॅन्स कमिटींत घेतल्यानें सन १८८६ चा बराच काळ कमिटीच्या कामानिमित्त सिमला, मद्रास व कलकत्ता येथें त्यांना हिंडावें लागलें. सगळ्या देशाच्या राज्यकारभारांतील जमाखर्चाचा हिशेब पाहून काटकसर सुच विण्यासाठीं ही कमिटी नेमण्यांत आली होती. या कमिटींत माधवराव हे एकटेच हिंदी गृहस्थ होते. पुढें सरकारनेंच कंजूषी दाखवून कमिटीमार्फत चालणारी ही चौकशी बंद केली. प्रथम सिमल्यास जातांना माधवरावांनीं आपल्या घरची कांहीं मंडळी व शंकर पांडुरंग पंडित यांना बरोबर नेलें होतें. सिमला येथून येतांना सहपरिवार माधवराव थोडा अधिक प्रवास करून मगच परत आले. पुढें मद्रास व कलकत्ता येथें मात्र फक्त रमाबाईंनाच माधवरावांनीं बरोबर नेलें होतें. या वयांतहि शिक्षणाची हौस माधवरावांत किती बाणली होती, हें कलकत्त्याच्या मुक्कामांतील एक साध्या गोष्टीवरून ध्यानांत येईल. रमाबाईंना बंगाली शिकविण्याचे निमित्तानें ते स्वतःच बंगाली भाषेचा अभ्यास करू लागले व थोडक्यांच दिवसांत त्यांनीं त्यांत चांगली प्रगतीसुद्धां केली.

सन १८८८ सालांत कलकत्त्याहून परत येतांच शेतकी खात्याच्या स्पेशल जज्जाचे जागेवर माधवरावांची कायमची नेमणूक करण्यांत

आली. या नव्या हुद्यामुळें आतां पुणें, सातारा, नगर, सोलापूर या चार जिल्ह्यांत फिरण्याचें काम माधवरावांचे अंगावर आलें.

## रखमाबाई प्रकरण

सन १८८७ च्या एप्रिलांत सुधारक सनातन्यांमध्यें एका प्रकरणाबाबत चांगलीच लढत झाली. वास्तविक १८८१ पासूनच संमतिवयाचे बाबतींत सुधारक–सनातन्यांचे खटके सुरू व्हावयास लागले होते. हिंदु कायद्यांत पुष्कळच सुधारणा व्हावयास पाहिजेत असा आग्रह धरून सुधारक निरनिराळ्या सुधारणा समाजापुढें आणि सरकारपुढें मांडीत होते. आपली सारी शक्ति एकवटून सनातनी त्यांना विरोध करीत होते. या ना त्या नात्यानें सुधारणापक्षाचे प्रमुख माधवरावच होते असें म्हणावयास हरकत नाहीं. आणि सनातन्यांचें पुढारीपण नुकतेंच पुढें येऊं लागलेले लो. टिळक यांनीं घेतले असून, ते माधवरावांशीं वाद करीत होते.

आणि अशा परिस्थितींत वर उल्लेखिलेलें ‘ रखमाबाईचा खटला ’ या नांवाचें एक प्रकरण उद्भवलें; व सनातनी–सुधारकांची चांगलीच जुंपली. तें प्रकरण असें.

सन १८६७ सालीं जनार्दन पांडुरंग या नांवाचा पांचकळशी जातींतला एक सुखवस्तु गृहस्थ वारला. सुमारें २५ हजार किंमतीची त्याची स्थावरजंगम मिळकत होती. त्याला फक्त एक मुलगीच होती. पुढें जनार्दन पांडुरंगाच्या विधवेनें १८७१ त डॉ. सखाराम अर्जुन याच्याशीं पुनर्विवाह केला. हिंदु कायद्यान्वयें पुनर्विवाहित बाईला पूर्व पतीच्या मालकीच्या मिळकतींतील एक छदामहि मिळत नाहीं. तेव्हां जनार्दन पांडुरंगाच्या मिळकतीची मालकीण त्याची मुलगी रखमाबाई हीच झाली, तेराव्या वर्षी रखमाबाईचे दादाजी नांवाच्या तरुणाशीं लग्न झालें.

पुढें रखमाबाई वयांत येतांच तिला आपले घरीं पाठविण्याबद्दल दादाजीनें डॉ. सखाराम अर्जुन यास कळविलें. अजून मुलगी लहान आहे. सबब घाई करूं नये असें त्यांनीं दादाजीस सांगितलें म्हणून तो स्वस्थ बसला. पुढें हे प्रकरण स. १८७४ त कोर्टांत गेलें. खालच्या कोर्टांत दादाजी हा अक्षरशत्रु, क्षयरोगी आहे, म्हणून मी नांदायला जात नाहीं, अशी रखमाबाईतर्फे कारणें सांगण्यांत आलीं. या कोर्टानें दादाजीविरुद्ध निकाल दिला. पण याविरुद्ध झालेल्या अपिलांत हायकोर्टानें हिंदु-कायद्याप्रमाणें रखमाबाईस नांदावयास गेलेंच पाहिजे असा ठणठणीत निकाल दिला. हें होई-पर्यंत तीन वर्षें जाऊन हायकोर्टाच्या निकालाला १८७७ साल उजाडलें. यापुढें रखमाबाई नवऱ्याकडे न जातां हायकोर्टाचा निकाल धाब्यावर जर बसविण्याचा प्रयत्न करील तर तुरुंगांत जाण्याचा प्रसंग येईल अशी पाळी आली होती. डॉ. सखाराम अर्जुन हे मुंबईच्या बड्या प्रस्थापैकीं एक असून सुधारकांमध्यें मोडत असत व त्यांच्या या खटल्यांतील संबंध पाहून कित्येक सुधारकांना या खटल्याबद्दल जिव्हाळा वाटत होता. पुढें प्रिन्सिपल वर्डस्वर्थ यांनीं त्याच वर्षीं 'रखमाबाई डिफेन्स फंड' काढला व त्यामुळें या प्रकरणाला एकदम भलतेंच स्वरूप प्राप्त झालें. 'हिंदुसमाजांतील स्त्रियांची होणारी छळणूक बंद झालीच पाहिजे' असें सुधारक म्हणत होते, तर 'सनातन हिंदुधर्माचा उच्छेद कदापीहि आम्हीं होऊं देणार नाहीं' अशी सनातन्यांनीं आरोळी ठोकली होती. या वादावादींत सनातनी पक्षातर्फे टिळकांनीं सुधारकाग्रणी माधवरावांवर सडकून हल्ले केले होते. केसरींत लिहिलेल्या 'रावबहादुरांचें अपूर्व बुद्धिचापल्य या लेखांत माधवरावांना संस्कृत तरी धड येतें कां नाहीं अशी टिळकांनीं शंका उपस्थित केली होती, इतकें या वादाला अतिरेकाचें स्वरूप प्राप्त झालें होतें. या वादापासून सुरू झालेले

टिळक आणि रानडे यांच्यांतील मतभेद यापुढे बरेंचे बळावले. त्या दोघांच्या वृत्तीच भिन्न असल्यामुळें सामाजिक काय, राजकीय काय, सर्वच चळवळींत त्यांचे मार्ग भिन्न होते इतकेंच. या प्रसंगापासून पुढें ते अधिकाधिक दूर होत गेले. इंग्रजी राज्य हिंदुस्थानांत आलें ही रानड्यांचे दृष्टीनें एक दैवी इष्टापत्ति होती, तर टिळकांना ती केवळ आपत्तीच वाटत होती. त्यामुळें इंग्रज सरकारकडे पाहण्याची दोघांची वृत्ति पूर्णपणें भिन्न होती. सामाजिक आणि धार्मिक बाबतींतहि तीच वृत्तिभिन्नता असल्यामुळें दोघांमधें तीव्र मतभेद होणें टळलें नसतें. पण येवढें असूनहि या दोघांना एकमेकांबद्दल अत्यंत आदर व प्रेम होतें. दर मंगळवारच्या केसरींतील टिळकांचा हल्ला वाचून सारा सुधारकांचा पक्ष हादरून जाई. आठवडाभर



केलेल्या त्यांच्या कलकलाटाला एका रट्ट्यांत टिळक हाणून पाडीत. मग सारेजण माधवरावांकडे जमून कोठें-तरी टिळकांना खरमरीत उत्तर लिहिण्याबद्दल माधवरावांना गळ घालीत. त्यांचें सर्वांचें बोलणें ऐकून शांतपणानें माधवराव उत्तर करीत " उगीच काय उत्तर देणार! आपल्यांपैकीं एकाला तरी टिळकांच्यासारखें मुद्देसूद आणि बोंचक लिहितां येतें कां? अगोदर त्यांची अचूक लिहिण्याची शैली साध्य करा व मग उत्तर देण्याच्या गोष्टी बोला. " या त्यांच्या उत्तरानें सारे लोक निरुत्तर होऊन जात असत.

## महाराष्ट्रांतील दुही

या वादापासूनच महाराष्ट्रांतील सामाजिक चळवळींत दोन तट पडून चांगलीच दुही माजण्यास सुरुवात झाली. काँग्रेसबरोबर माधवरावांनीं स्थापन केलेल्या सामाजिक परिषदेंतहि यापुढें या दुहीचे प्रतिध्वनि उठूं लागले. सन १८९० मध्यें तर सामाजिक सुधारणेच्या वादानें महाराष्ट्रांत अत्यंत कठोर स्वरूप धारण केलें. दोन पक्ष एकमेकांना पाण्यांत पाहूं लागले. संमतिवयाची चर्चा अजून हिरहिरीनें चाललीच होती व दोन्ही पक्ष एकमेकांना उगीचच गालिप्रदान करण्यांतच दंग होते. पण असल्या खातेऱ्यांत माधवरावांचें मन कधींच रमत नसे. आपल्याला काय बोलावयाचें तें बोलून टाकल्यावर ते परत त्याचा कुत्सितपणानें कधींच विचार करीत नसत. फार काय, आपणावर कोणी टीका करतात किंवा नाहीं हेंहि ते पहात नसत. आणि यामुळें सामाजिक सुधारणेच्या वादाची धुळवड त्यांचे अनुयायांत व प्रतिपक्षांत चालली असतां, एका नव्याच कार्यक्षेत्राचे दालन साऱ्या महाराष्ट्रापुढें उघडण्याच्या प्रयत्नांत माधवराव होते.

## औद्योगिक परिषद

सन १८९० सालीं त्यांनीं औद्योगिक परिषदेचा उपक्रम सुरू करून औद्योगिक चळवळींत लक्ष घालणाऱ्या लोकांना कर्तबगारी दाखविण्याचें एक नवीनच स्थळ निर्माण केलें. निरनिराळ्या औद्योगिक प्रश्नांचा आपल्या प्रास्ताविक भाषणांत खल करून या नवीन संस्थेच्या कामाची खालील कलमांत माधवरावांनीं रूपरेषा आंखली. ( १ ) जात, गोत, पक्ष यांचा संस्थेंत शिरकाव होतां कामा नये.(२) अव्यवहार्य उद्देश पुढें ठेवला जाऊ नये. (३) आपली

स्थिति पूर्णपणें ओळखावी, कर्तव्याचा निश्चय व उद्योग अखंड कायम ठेवावा. (४) परदेशांतील औद्योगिक उलाढालींचा अभ्यास करावा आणि त्या पासून जो फायदा घेतां येईल तो घ्यावा. (५) सरकारी मदतीवर विसंबून राहूं नये (६) आपलें भांडवल वाढवावें. (७) उद्योगधंद्यांच्या शाळा स्थापन कराव्या. असा त्या कलमांचा सारांश आहे.

## परदेशी भांडवल

पुढील वर्षी प्रतिगामी सरकारी धोरणामुळें साऱ्या देशभर स्वदेशीची लाट उसळली. याच वेळीं एका व्याख्यानांत 'देशांतील यांत्रिक सामर्थ्य वाढविल्याखेरीज स्वदेशीचें व्रत योग्य रीतीनें पाळलें जाणार नाहीं' असें माधवरावांनीं सांगितलें. पण त्या व्याख्यानांत हजर असलेल्या टिळकांना तें मत पटलें नाहीं.त्यांनीं ताबडतोब उठून "स्वदेशी माल वापरणें, हा देशाभिमानाचा प्रश्न आहे, व त्यामुळें अर्थशास्त्राच्या सिद्धांतांना क्षणभर धाब्यावर बसविण्यास हरकत नाहीं." असा माधवरावांना जबाब दिला. त्याच वर्षीच्या म्हणजे सन १८९१ च्या औद्योगिक परिषदेमध्येंहि दुही झाली. या परिषदेमध्यें शेतकऱ्यांच्या बँकासंबंधीं एक निबंध माधवरावांनीं लिहिला होता. परदेशी भांडवल हिंदुस्थानांत आलें म्हणून नुकसान होत नाहीं, अशी माधवरावांची बालंबाल खात्री असल्यामुळें परदेशी भांडवलवाल्यांना त्यांनीं आपल्या विचारांतून वगळलें नव्हतें. १८९० नंतर उदयास आलेल्या देशभक्तांना माधवरावांनीं परदेशी भांडवलाविषयीं दाखविलेली अनुकूलता आवडली नाहीं. अशी अनुकूलता व्यक्त करूं नये, असा टिळक, नामजोशी वगैरे देशभक्तांचा आग्रह पडला. केवळ परिषदेमध्यें फूट होऊं नये या सदिच्छेनें माधव-

रावांनीं तो आग्रह कबूल केला. दोन्ही पक्षांनीं परदेशी भांडवलाबाबत चकारशब्द सुद्धां तोंडांतून काढूं नये असें ठरलें. पण नव्या देशभक्तां-पैकीं कांहींना व्यासपीठावर चढतांच भान राहिलें नाहीं. त्यांनीं परदेशी भांडवलावर यथेच्छ तोंडसुख घेतलें. या सभेला माधवरावांनीं कांहीं युरोपियन व्यापाऱ्यांना आणि भांडवलवाल्यांनाहि बोलावलें होतें. पण वरील गृहस्थांचें भाषण मराठींत झाल्यामुळें या युरोपियनांना आपल्याला दिलेल्या शिव्या कळल्या नाहींत हें बरें झालें.

## माधवरावांचा राग

पुढें माधवराव बोलावयास उठले. आपल्या प्रतिपक्षानेंच अगोदर अटी मोडल्यामुळें आपण तरी आतां कां त्या अटींचें बंधन पाळा, अशा विचारानें माधवरावांनीं परदेशी भांडवलाचा मुद्दा काढलाच. त्याबरोबर माधवरावांच्या भाषणांत अडथळा आणण्याचे निमित्तानें सभेमधें दंगलच उडाली. या प्रकारानें माधवराव इतके चिडले कीं, त्या वेळीं त्यांनीं आपला आवाज चढवून खडया सुरांत या नव्या देशभक्तांच्या वागणुकीची चांगलीच हजेरी घेऊन त्यांची कानउघाडणी त्यांनीं केली. त्याबरोबर सारी सभा तटस्थ झाली. माधवरावांचें उग्र स्वरूप पाहून गोंगाट करणाऱ्यांची बोबडीच वळली, व त्यांच्या पुढाऱ्यांची गाळण उडून त्यांच्या जिभेला खीळ पडली. अर्थात् या वेळीं खीळ पडलेलीं तोंडें परिषद् बरखास्त होतांच अद्वातद्वा बडबडूं लागलीं. 'परदेशी भांडवलांचें गोडवे गाणारे माधवराव देशद्रोही आहेत' असेंहि बडबडण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं.

## करमाळ्याचें दुखणें

सन १८९१ च्या जानेवारी महिन्यांत आपल्या कामानिमित्त माधवराव नगर जिल्ह्यांत फिरतीवर गेले होते. हा सर्व जिल्हा फिरून ते लगेंच सोलापूर जिल्ह्यांत गेले. या वेळीं करमाळा येथें

मुक्काम असतां अतिशय कामाचा ताण पडल्यामुळें माधवराव आजारी पडले. थोडक्याच दिवसांत हें आजारीपण भलतेंच वाढलें व माधवरावांच्या जीविताविषयीं काळजी उत्पन्न झाली. या वेळीं माधवरावांच्या पत्नी रमाबाई या त्यांचेजवळ होत्या. त्यांनीं प्रत्येक गोष्ट तत्परतेनें आणि जागरूकतेनें केल्यामुळेंच या आजारांतून माधवराव बचावले गेले असें म्हटलें पाहिजे. या आजारीपणांतील रमाबाईंच्या भावना व त्यांनीं केलेल्या शुश्रूषेची पराकाष्ठा हीं त्यांच्या पुढील उताऱ्यांत त्यांनींच मोठ्या तन्मयतेनें रंगविली आहेत.

" डॉक्टर आंत बिछान्याजवळ बसूनच होते. हे जातीनें मुसलमान असून वागणुकीनें फारच सालस व सुशील होते. औषधोपचार करावयाचे ते आस्थापूर्वक व काळजीनें करीत होते, तरी प्रकृतीचें मान घटकोघटकीं अधिक होऊं लागलें. फार घाम सुटत होता व हाताचे पंजे काळे पडलेच होते, त्यांत आतां तोंडही भस्म सारविल्यासारखें कळाहीन दिसूं लागलें. पटकीचीं सर्व लक्षणें स्पष्ट दिसूं लागलीं. आवाज अतिशय खोल गेला. बोललेला शब्द तोंडाशीं कान लावल्याखेरीज ऐकूं येत नसे. बोलावयाचें तें काय? दिवसभरांत " तूं घाबरूं नकोस, भिऊं नकोस, लक्ष लावून बाटलीवरचीं अक्षरें नीट वाचून मग औषध देत जा, घाबरेपणानें भलतेंच देशील, " वगैरे धीर देण्याचें बोलणें, दिवसांतून कितीएक वेळां चाललें होतें. प्रकृतीचें मान धडधडीत उघड दिसत होतें, त्यामुळें माझा जीव अगदीं भेदरून गेला होता व वारा प्याल्यासारखा झाला होता.

वर लिहिल्याप्रमाणें स्वतःचें धीराचें बोलणे ऐकिलें म्हणजे माझ्या जिवांत नवीन जीव आल्यासारखें होऊन तशा स्थितींतही मला त्यातल्यात्यांत हुषारी वाटे; पण तें बोलणेंहि आतां बंद पडल्यामुळें माझा सर्वस्वी धीर सुटला. धरणी आणि आकाश यांशिवाय आपलेपाशीं

आतां दुसरें कोणी नाहीं. दयाळू आणि सर्वांच्या धांवणीला धांवणारा तो कनवाळू परमेश्वर या वेळीं कोठें आहे? माझा विश्राम आजपर्यंत सर्वस्वी त्याच्यावर आहे. त्याच्यावांचून या वेळीं मला दुसरें कोणी नाहीं, हें त्याला समजत नाहीं काय? वगैरे मी आपल्या मनाशीं पुष्कळ बोलून रडलें व त्याच आवेशांत उठून नाडी पाहिली. जवळ डॉक्टर व कारकून बसले होते, त्यांना मी जरा आंत जाऊन येतें,' असें सांगून, ज्या देवळांत आम्ही उतरलों होतों, त्याच महादेवाच्या गाभाऱ्यांत देवासमोर जाऊन बसलें.

## देवापुढील प्रार्थना

ही वेळ रात्रीची तीन वाजण्याची होती. आंत एक म्हातारी गुरवीण निजली होती, तिला बाहेर जाण्यास सांगितलें. पणतींतील नंदादीप अगदीं मंद जळत होता, तेंही मला बरेंच वाटलें. कारण या वेळेस मनाची वृत्ति अशी झाली होती, कीं देव आणि आपण यांशिवाय तिसरें येथें कोणी नको, दिवासुद्धां नसता तर बरें झालें असतें, असें वाटलें. होता तो मात्र मालविण्यास हात धजेना. तसें मनांतसुद्धां आणणें अशुभ आहे, असें वाटून मी देवापुढें थोडी भ्रमिष्टासारखी बसले. तोंडांतून कसला उच्चार होईना म्हणून डोकें धरून हळूच पण पुष्कळ वेळ मन मोकळें करून रडलें. पुष्कळ रडून मनाचा भार थोडा कमी झाल्यावर मनाला वाटेल तितकें बोललें, प्रार्थना केली व शेवटीं मनाला सर्व प्रकारें दीनपणा आला होता तरी त्यांतल्यात्यांत त्राग्यानें "आम्ही दीन तुझ्या दारीं संकटांत येऊन पडलों आहों; तुला वाटेल त्या रीतीनें आम्हांला बाहेर काढ; तूं सर्वांतर्यामीं म्हणवितोस त्या तुला माझी करुणा आली नाहीं, तर ह्या बाहेरच्या मोठ्या विहिरीला तरी खचित

करुणा येऊन ती मला पोटांत घेईल, वगैरे काय हवें तें बडबडलें!"
सर्व रीतीनें श्रांत झाल्यामुळें कीं काय कोण जाणे, दुखण्याची इतकी
भयंकर स्थिति झाली असतांही कांहीं सेकंद तेथेंच माझा डोळा
लागला.

## एक स्वप्न

तेवढ्यांत मला एक स्वप्न पडलें, कीं मी कोठें तरी उंच डोंगरांत
देवस्थान आहे तेथें गेलें आहे. देवळाखालींच कृष्णेचें पात्र आहे.
तिचे कांठीं वटपिंपळाचे वृक्ष जागोजाग असून त्यांना मजबूत पार
बांधिले आहेत व मधून मधून मोठे घाट आहेत. अशा एका उंच
घाटाजवळच पारावरील वटवृक्षाला दोन्ही हात टेंकून खालील
मजा पहात मी उभी आहें. त्या दिवशीं विशेष कांहीं तरी मोठी
पर्वणी होती म्हणून हजारों स्त्रिया व पुरुष कृष्णाबाईत स्नान करीत
होतीं. मी ज्या उंच व विस्तृत वटवृक्षाला दोन्ही हात टेंकून धरून
उभी होते, तो एवढा मोठा वृक्ष पडतोच कीं काय, असा पुढें पुढें
वांकूं लागला व त्यामुळें पाराचे चिरेच्या चिरे उखळूं लागले. हें पाहून
मी अतिशय घाबरलें व दोन्ही हातांनीं त्या वटवृक्षाला कवटाळून धरून
मोठ्या आक्रोशानें खालील ब्राह्मणांना हांका मारून व ओरडून
सांगूं लागलें "अहो! पहा! हा वृक्ष पडत आहे, कोणी खालून
याला हात लावा, धिरा द्या, हा पडला तर हजारो माणसांचे प्राण
जातील." असें म्हणून माझ्यामध्यें होतें तितकें सामर्थ्य खर्चून मी
तो वृक्ष आपल्याकडे ओढीत आहें. माझा जीव घामाधूम होऊन
तोंडाला कोरड पडली आहे, इतक्यांत खालील मंडळी नदींतून
ओलेत्यानें धाऊन येऊन हजारों माणसांनीं त्या वटवृक्षाला
खालून आपापल्या हातांचा टेका दिला. असें झाल्यावर एकदोन

मिनिटांत तो वृक्ष अधिक न वांकतां तितक्याचा तितका घट्ट राहिला. आतां तो वृक्ष खालीं येत नाहीं अशी खात्री झाल्यावर खालच्या माणसांनीं हात सोडले व मलाही आनंद झाला. अजून माझा विळखा वृक्षाला आहे तोंच आमच्या शिरस्तेदारांनीं येऊन मला हांक मारली.

मी घाबरून एकदम उठलें व तडक तशीच अंथरुणापाशीं गेलें खरी, पण मला कां बोलावलें! काय स्थिति आहे? वगैरेंचा मला कांहींच समज पडेना. मी वेड्यासारखी चोहोंकडे पाहूं लागलें, इतक्यांत डॉक्टर मला म्हणाले " खालीं वांका, कांहीं बोलण्याची इच्छा आहे असें दिसतें. "

मीं लागलींच खालीं वांकून स्वतःच्या तोंडाजवळ कान नेला. तेव्हां खोल शब्दांनीं हळूच म्हटलें, " मला बसता करा. मला उलटी होत आहे. "

तें ऐकून मीं व डॉक्टर मिळून हळूच बसतें केलें तोंच मोठ्या जोरानें उलटी झाली. अवसान सुटलें व एकदम मान टाकली. उसें उंच करून व हळूंच टेंकून ठेवल्यावर डॉक्टरांनीं नाडी पाहिली. संध्याकाळपासून जो गार घाम भटला होता, तो आता अगदीं बंद झाला. पण अंगाचा विशविशीतपणा व गारवा मात्र तसाच कायम होता. म्हणून डॉक्टर मला म्हणाले, " रात्रीपासून विचारीत होतां ती मात्रा आतां द्या. "

मीं तुळशीच्या रसांत हेमगर्भाची मात्रा उगाळून दोनतीन बोटें चाटविली. नाडींत चलबिचल होती व ती असावी तशी नव्हती. तशांत आणखी एकदां आजाराचा जास्त जोर झाला. आतां मात्र स्वतःचा धीर सुटला व मला सांगितलें " आतां माझें बरें नाहीं. कोठें पुणें आणि कोठें मी? तूं अगदीं एकटी आहेस! "

असें म्हटल्यावर एकदम हुंदका आला. " भिऊं नको. देव तुला आहे ! घरीं तार करून दुर्गोला बोलाव. "

मीं पुनः हेमगर्भाची मात्रा चाटविली व डॉक्टरांनीं दिलें तें औषध पाजून वर थोडी कांजी पाजिली आणि मोठा धीर करून म्हटलें, " डॉक्टर म्हणतात रात्रीपेक्षां आतां बरें आहे, धीर सोडूं नये, घरीं तार केली आहे. डॉ. विश्रामजी व वन्सं आतां सकाळीं लवकर येतील. "

ही वेळ सकाळचे पांच वाजण्याची होती. डॉक्टर व मी अशी दोहों बाजूला नाडी धरून बसलों होतों. मीं नांवाला हात धरला होता, पण चित्त जाग्यावर नसल्यामुळें नाडींत होणारी चलबिचल मला कांहींच समजत नव्हती. उलट, नाडी बंद झाली असें वाटून मी स्वतःच्या तोंडाकडे पाहून डॉक्टरांकडे पाही, तेव्हां ते घाबरूं नका अशी हातानें खूण करीत.

## धीर आला

अशीं पांचसात मिनिटें गेल्यावर आतां मात्र नाडी खचित बंद झाली असें माझ्या मनानें घेतलें, व कदाचित् मी मोठ्यानें ओरडलेंहि असतें. इतक्यांत डॉक्टरांच्या लक्षांत येऊन ते म्हणाले, " झोंप लागली आहे, भिऊं नका, ओरडूं नका, मी खोटें बोलत नाहीं. झोंप मोडली तर मात्र घात होईल. ही पहा झोंप लागली आहे व अंगांत ऊब येत आहे " हें त्यांचें बोलणें संपलें नाहीं तोंच स्वतःचा नेहमींच्या घोरण्याचा आवाज मला ऐकूं आला व माझें मन स्थिरावलें.

यापुढें सुमारें वीस मिनिटें चांगली झोंप लागली. रात्रीपासून थंडगार पडलेलीं सर्व इंद्रियें व अंगें आतां ताप आल्यासारखीं कढत

झालीं. नाडीचे ठोके अधिक जोरानें व लवकर पडूं लागले. तरी पण झोंप लागलीच होती. अशा स्थितींत एक तास पक्की झोंप लागल्यावर सुमारें सात वाजतां डॉ. विश्रामजींची गाडी आली. त्यांना व वन्संना पाहून मला धीर आला.

डॉक्टर विश्रामजी हे बिछान्याजवळ आल्याबरोबर, हे आपले आप्त किंवा गुरु नाहींत याचें भान बिलकूल न राहून मीं एकदम पुढें जाऊन त्यांचे पाय धरले व पायांवर डोकें ठेवून म्हणालें "आतांपर्यंत या डॉक्टरांनीं मेहेरबानी करून प्रकृति सांभाळून तुमच्या हातीं दिली आहे. आतां तुम्ही सांभाळा. तुमच्या रूपानें देवच मला साह्य करण्यास आला आहे, असें मी समजतें."

विश्रामजींनीं जवळ जाऊन नाडी पाहिली. त्या वेळीं अर्धवट झोंपच होती, म्हणून डॉक्टरला घेऊन ते जरासे पलीकडे गेले व आतांपर्यंत औषधपाणी वगैरे काय दिलें याची चौकशी करूं लागले. वन्सं अंथरुणाजवळ बसल्या होत्या. बराच वेळ गेल्यावर स्वतः डोळे उघडून वर पाहिलें. वन्सं व विश्रामजी यांच्याकडे पाहून व त्यांना ओळखून म्हटलें, "तुम्ही आलांत! काय ही माझी स्थिति!" आणि जो गहिंवर आला, त्याबरोबर अशक्तपणामुळें क्षणभर मूर्च्छा आली.

विश्रामजींनीं थोडा वारा घालून सावध केल्यावर सांगितलें, "मी आलों आहें, आतां कांहीं भ्यावयाला नको; जें काय संकट होतें तें काल होतें. आतां तें टळलें."

असें म्हणून त्यांनीं आपल्या बॅगमधून एक बाटली काढून तींतील औषध एका ग्लासांत ओतलें व थोडेंसें पाणी घालून तें पिण्याकरितां पुढें केलें. तेव्हां "मला बसतें करा," असें हळूंच म्हटलें.

आम्हीं दोघांनीं बसतें केल्यावर डॉक्टरांनीं पुढें केलेला ग्लास आपल्या हातांत घेऊन " पिऊं कां ? " असें विचारलें. त्यांनींहि होय म्हटल्याबरोबर ग्लास तोंडाकडे नेला; पण काय वाटलें कोण जाणें ग्लास तसाच पलीकडे ठेवून एकदम अंग अंथरुणावर टाकलें. " असें कां ? " म्हणून डॉक्टरांनीं विचारल्यावर जरा चिडल्या-सारख्या स्वरानें म्हटलें " अशी कोणी माझी थट्टा करूं नका; माझा एवढा नियम चालवा; याशिवाय मला कसलेंहि औषध दिलेंत तरी मी घेईन. "

यावर डॉ. विश्राम यांनीं पुष्कळ तऱ्हेनें समजूत घालून सांगितलें, " हें औषध मी अगदीं निरुपायाशिवाय वापरीत नाहीं. मला आपला स्वभाव ठाऊक आहे. पण अंगांतील गारठा व वेळोवेळीं येणारी मूर्च्छा कमी होण्यास दर दोन तासांनीं वीसपासून तीस थेंब घेतले पाहिजेत व पुण्यास जाईपर्यंत हें माझें बोलणें ऐकलें पाहिजे. तेथें गेल्यावर याच्या जागीं दुसऱ्या औषधाची योजना करीन. " याप्रमाणें ऐकल्यावर मुकाट्यानें पण " राम राम " असे शब्द उच्चारून मोठ्या कष्टानें औषध घेतलें.

## पुण्यास निघालों

याप्रमाणें तो दिवस तेथेंच काढून दुसरे दिवशीं आम्ही करमा-ळ्याहून निघून बैलगाडींतून जेऊरच्या स्टेशनवर आलों. स्वतःला बैलगाडींतच मऊ गाद्या घालून ठेविलें होतें, व गाडीला थोडासुद्धां धक्का न बसेल इतकी हळू ती चालविली होती. गाडीबरोबर डॉ. विश्राम, मी, वन्सं वगैरे पायींच चालत होतों. दर वीस मिनिटांनीं किंवा अर्ध्या तासानें डॉक्टर नाडी पाहून औषध देत. याप्रमाणें अकरा वाजण्याच्या सुमारास आम्ही जेऊर स्टेशनावर येऊन

पोहोंचलों. तेथें संध्याकाळपर्यंत मुक्काम करून संध्याकाळच्या गाडीनें सेकंड क्लासचा रिझर्व डबा करून रात्रीं दहा वाजतां पुण्यास येऊन पोहोंचलों. मुंबईस चि. बाबाभावोजी शिकत होते त्यांना आदले दिवशीं तार केली होती; त्याप्रमाणें ते व प्रिन्सिपाल वामन आबाजी मोडक असे जेऊरच्या स्टेशनावर येऊन मिळाले. त्याचप्रमाणें पुण्याहून कीर्तने व दुसरी मंडळी जेऊरासच आली होती. यांसकट आम्ही पुण्यास येऊन पोहोंचलों.

आजारीपणाची बातमी अगोदर दोन दिवस शहरभर पसरली होती, त्यामुळें सर्व मंडळी काळजींत होती. आम्ही " आज रात्रीं पुण्यास स्टेशनावर चांगला मेणा घेऊन या, " अशी तार घरीं केली होती. त्याप्रमाणें आमच्या घरचीं माणसें मेणा घेऊन स्टेशनावर आलीं. त्या वेळीं दुसरी मित्रमंडळी स्टेशनावर भेटण्याकरितां आली होती. गाडी स्टेशनांत आल्याबरोबर मेणा आणून डब्याशीं लावला व धक्का न लावतां स्वतःला हळूच उचलून मेण्यांत ठेविलें व कोणाचीच प्रत्यक्ष भेट होऊं न देतां दारें बंद करून मेणा हळूहळू घराकडे रवाना केला.

ह्या दुखण्यांत अशक्तपणा इतका आला होता, कीं मनाला आनंद किंवा दुःख थोडें जरी वाटलें तरी लागलीच मूर्च्छा येई. त्यामुळेंहि पुढें भेटावयास येणाऱ्या मित्रांस व आप्तांस बरेच दिवस भेटूं देऊं नये अशी डॉ. विश्राम यांनीं ताकीद दिली.

हें दुखणें चांगलें बरें होऊन कामावर जाऊं लागण्यास, सुमारें दोन महिने लागले. "

## आदर्श पत्नी

येवढा वेळपर्यंत सारी माधवरावांचीच हकीकत झाली. त्यांच्या पत्नी रमाबाई यांची कांहींच माहिती आलेली नाहीं. वरील आजारी-

पणांतील त्यांची वागणूक आणि अनन्यभक्तिपूर्वक लिहिलेला हा उतारा यांवरून त्यांचें आपल्या पतीविरील प्रेम दृष्टोत्पत्तीस येतेंच. सन १८७३ सालीं त्यांचें लग्न झालें; या वेळीं माधवराव बत्तीस वर्षांचे व रमाबाई अवघ्या अकरा वर्षांच्या होत्या, हें वर एके ठिकाणीं आलेंच आहे. लग्नापूर्वी रमाबाईचें शिक्षण अजीबातच झालेलें नव्हतें. म्हणून लग्न होतांच जेव्हां माधवरावांनीं त्यांना शिकवावयाचें ठरविलें, तेव्हां त्यांना श्रीगणेशायनमः पासून शिकवावें लागलें. अर्थात् रमाबाईनींहि मोठ्या उत्साहानें शिकावयास आरंभ केला. पोरवयानुसार मधून मधून त्या कंटाळत असत. पण पुढें लौकरच त्यांची चांगली प्रगति होऊं लागली. रमाबाईच्या या शिक्षणाचे बाबतींत एक मोठें संकट त्यांचेवर येऊन पडलेलें असे. घरांत माधवरावांची घरीं परत आलेली बहीण, आत्याबाई व सावत्र आई इतक्या जुन्या वळणाच्या बायका होत्या. त्यांना हें शिकणें, अर्थातच पसंत नव्हतें. त्यांच्या मतें माधवरावांनीं शिकण्याचा आग्रह करणें हें बरोबर होतें, पण रमाबाईनीं इतकें शिक्षणाच्या आहारीं जाणें त्यांना पसंत नव्हतें. अर्थात् टोंचून खोंचून बोलणें, इत्यादि प्रकारांनीं त्या आपला निषेध व्यक्त करीत. आणि यामुळें रमाबाईना फारच त्रास होत असे. एकादी किरिस्तांवबाई शिकवावयास ठेवली असली तर ती जातांच रमाबाईना गार पाण्यानें स्नान करावें लागे. यामुळें त्यांची प्रकृतीहि एकदां बिघडली होती. पण इतका त्रास होत असतांहि रमाबाईनीं आपलें शिक्षण सोडलें नाहीं, कीं आपल्या त्रासाची कल्पनाहि माधवरावांना आणून दिली नाहीं. 'चहाडीनें एक कुटुंबच काय, पण मोठमोठीं राज्यें देखील लयाला जातात' हा आपल्या वडिलांच्या उपदेशाचा सोन्याचा ठेवा रमाबाईनीं आपल्या हृदयाशीं बाळगला होता.

थोडक्याच दिवसांत आपल्या पतीस अनुरूप अशी समजूतदार आणि शिकलेली स्त्री म्हणून रमाबाईचें नांव जिकडे तिकडे झालें. अधूनमधून पतीच्या इच्छेनुरूप सार्वजनिक कामामध्येंहि त्या भाग घेऊं लागल्या होत्या. तरी पण माधवराव म्हणजे त्यांचे जणूं देवच. इतक्या अनन्यभावानें ते सांगतील तसें वागण्यांत त्यांना धन्यता वाटावी अशीच त्यांची वागणूक होती.

## पंचहौद चहाप्रकरण

करमाळ्याहून आजारीपणांतून उठून परत येऊन, पुनः पूर्ववत् काम करावयास त्यांना बरेच दिवस लागले. ते पुण्यास परत आल्यानंतर, पुण्यामधें एक मोठेंच चहाचे कपांतील वादळ सुरू झालें व बरेच दिवस त्यावर चर्चा चालू राहिली. वास्तविक या प्रकरणास सुरवात सन १८९० च्या ऑक्टोबरांतच झाली होती. या महिन्याच्या चौदा तारखेस सेन्ट मेरीज कॉन्व्हेंटमध्यें कांहीं समारंभ होता. शहरांतील शेंपन्नास माणसांना मिशनरी लोकांनीं आमंत्रण दिलें होतें. या निमंत्रणांतून पुण्यांतील कोणीहि ठळक इसम सुटला नव्हता. टिळक, रानडे, सीतारामपंत देवधर, गोविंदराव कानिटकर अशीं त्या वेळचीं बडीबडीं बेचाळीस माणसें हजर होतीं. व्याख्याना-नंतर चहा आलाच. बरोबर बिस्किटेंहि होतींच. कित्येकांनीं चहा-बिस्किटांचा समाचार घेतला. कित्येकांनीं चहाचा कप हातांत घेऊन नुसता सन्मान केला. तर कित्येक नुसते स्वस्थ बसले होते.

या प्रकरणानंतर सहा महिन्यांनीं, त्यावेळची एक प्रसिद्ध व्यक्ति गोपाळराव जोशी यांनीं कांहीं हजर असलेल्यांचीं व कांहीं नसले-ल्यांचींहि नांवें दडपून त्या वेळच्या 'पुणें-वैभवां'त छापलीं. या प्रकरणानें पुण्याच्या ब्राह्मण्यरक्षक पुढाऱ्यांनीं चहा घेणाऱ्यांवर

बहिष्कार टाकण्याचा गांवांतील भिक्षुकांच्या व आचारी—पाणक्यांच्या मागें ससेमिरा लावला. यामुळें या प्रकरणीं भाग घेणाऱ्या मंडळींच्या बायकामंडळींना दररोजच्या घरगुती व्यवहारांत फारच त्रास होऊं लागला.

कांहीं सनातनी मंडळींनीं या बाबतींत न्याय मिळविण्यासाठीं श्रीशंकराचार्यांकडे फिर्याद ठोकली. श्रींनीं १८९२ च्या जानेवारींत शिक्कामोर्तब देऊन दोन लोक चौकशीसाठीं पाठविले. पुढें या चौकशींत सर्वजणांना प्रायश्चित्ताची शिक्षा सांगण्यांत आली. अर्थात् सर्वजणांना म्हणजे, ज्यांनीं खरोखरीं तेथें चहा घेतला होता त्या सर्वांना. टिळक व रानडे यांनीं श्रींचा अधिकार कबूल केला व ते प्रायश्चित्त घेऊन मोकळे झाले. पण वै. का. राजवाडे, प्रो. वासुदेवराव केळकर व प्रो. पानसे प्रभृतींनीं प्रायश्चित्त घेण्याचें साफ नाकारलें. जवळजवळ दोन वर्षें पुण्यामध्यें या प्रकरणाचें चर्वितचर्वण चाललें होतें.

## माधवरावांचें प्रायश्चित्त

वास्तविक पाहतां पंचहौद मिशनचे समारंभाचे वेळीं माधवराव बिस्किटाला शिवलेसुद्धां नव्हते किंवा चहाहि प्याले नव्हते. केवळ मान राखण्यासाठीं चहाचा कप त्यांनीं हातांत घेतला होता येवढेंच. तरी पण ते प्रायश्चित्त घेण्याच्या पहिल्यापासून विरुद्ध होते. त्यांच्या प्रायश्चित्त न घेण्याच्या आग्रहानें त्यांच्या कांहीं मित्रांनींहि तसेंच वागावयाचें ठरविलें होतें. पण त्यांपैकीं एका मित्राच्या अशा वागणुकीनें, त्याच्या कुटुंबसौख्याचा नाश होत आहे असें कांहीं दिवसांनीं माधवरावांना आढळून आलें. त्यांना हें बरें वाटलें नाहीं. या वेळीं सुट्टीनिमित्त ते लोणावळ्यास होते. तडक पुण्यास जाऊन त्यांनीं प्रायश्चित्त घेण्याचें ठरविलें. त्यांनीं प्रायश्चित्त घेतल्यावर

अर्थात् त्यांच्या वर उल्लेखिलेल्या मित्रानेंहि प्रायश्चित्त घेतलें. कांहीं लोकांनीं माधवरावांवर टीकेचा मारा करण्यास सुरवात केली. माधवरावांना मात्र अंतर्यामीं समाधानच वाटत होतें.

पुढें कांहीं दिवसांनीं त्यांचा मित्र त्यांचेजवळ येऊन म्हणाला, " प्रायश्चित्त घेण्याचे वेळपर्यंत आपण हें करतों हें बरें नव्हे असें मलाहि वाटत होतें. पण वडिलांची त्यानंतरची प्रेमळ वागणूक पाहून आतां मीं केलें तेंच बरें असें वाटतें. "

या त्यांच्या उद्गारांनीं माधवरावांनाहि अतोनात समाधान झालें.

## माधवरावांचें मित्रप्रेम

आपल्या विद्यार्थीदशेच्या आयुष्यापासून माधवरावांनीं अनेक चांगले मित्र जोडले होते, ते त्यांच्या याच गुणामुळें. मित्रासाठीं वाटेल त्या प्रकारचा त्रास सोसावयाची त्यांची तयारी असे. त्यामुळें कीर्तने, विष्णुशास्त्री पंडित, लोकहितवादी, कृष्णशास्त्री, पंडित, बाळ मंगेश वागळे, डॉ. भांडारकर इत्यादि अनेक मोठे लोक त्यांचे मित्र म्हणवून घेण्यांत अभिमान बाळगत असत. कृष्णशास्त्री चिपळूणकर सन १८७८ मध्यें बरेच आजारी होते. त्या वेळीं माधवराव पुणें येथेंच असून रोज त्यांच्या शुश्रूषेला जात असत. त्याच वर्षीं ता.२० मे रोजीं ते मृत्यु पावल्यावर त्यांच्या स्मारकसभेचे वेळीं माधवरावांनीं अत्यंत भावनावशतेनें एक लांबलचक भाषण केलें होतें. चहाग्रामण्य प्रकरणानंतर लगेंच माधवरावांवर दोन मित्रांचे मृत्यु पाहण्याचा प्रसंग आला. एक लोकहितवादी गोपाळराव देशमुख व दुसरे वामन शिवराम आपटे. पैकीं लोकहितवादी अगदीं पिकलें पान असून वयाच्या सत्तराव्या वर्षी मृत्युमुखीं पडले होते. पण वामन शिवराम आपटे वयाच्या अवघ्या चौतिसाव्या वर्षीं हा लोक सोडून गेले होते. त्यामुळें त्यांचेबद्दलचें दुःख त्यांच्या सुहृज्जनांचीं हृदयें

विदीर्ण करीत होतें. माधवराव स्मशानयात्रेसाठीं म्हणून वामनरावांच्या घराकडे गेले होते. तेथें जातांच त्यांच्या दृष्टीस एक चमत्कारिक दृश्य पडलें. ज्यांचें मुख सदैव बृहस्पतीच्या तेजानें शोभायमान दिसे त्या वामनरावांचें तोंड या वेळीं कोणास दिसूं नये म्हणून तें कांहीं लोक एका वस्त्राखालीं बांधीत होते.

याचें कारण विचारतांच माधवरावांना असें कळलें कीं, ते निपुत्रिक असलेमुळें असें करणें प्राप्त होतें. माधवरावांच्या डोळ्यांतून टचकन् पाणी आलें. लगेंच त्यांनीं तेथल्या तेथें उत्तर दिलें, " काय म्हणतां, वामनरावांना मुलें नाहींत. मग तुम्हाला माहींत नाहीं. अहो, कदाचित् तुमचीं आमचीं मुलें आपल्या मागें आपल्या नांवाला कालिमा आणतील, आणि फार तर पांच पन्नास वर्षें तीं आपलें आयुष्य या जगांत काढतील, पण वामनरावांचीं मुलें अशीं आहेत कीं संस्कृत भाषा जिवंत असेपर्यंत तीं चिरंजीव राहतील, येवढेंच नव्हे तर आपल्या पित्याचें नांव पिढ्यान् पिढ्या उजळ करतील! काय तुम्हाला ठाऊक नाहींत त्यांच्या मुलांचीं नांवें ? मी सांगतों, "एक त्यांचा संस्कृत-इंग्रजी कोश, दुसरा इंग्रजी-संस्कृत कोश, आणि तिसरें त्यांचें गाईड."

माधवरावांचें हें भावनाप्रधान वक्तव्य ऐकून तेथील मंडळींना अगदीं भडभडूनच आलें. अर्थात् वामनरावांचें तोंड बांधलें गेलें नसेल यांत काय संशय !

## 'आमचा देव महादेव'

याच वर्षीं कॉंग्रेसची स्थापना करण्याचा मान ज्यांना दिला जातो ते ह्यूमसाहेब पुण्यास आले होते. या साहेबांनीं माधवरावांची योग्यता चांगलीच ओळखली असल्यामुळें ते माधवरावांना आपला गुरु

मानीत. पुण्यास आले असतां त्यांचे सन्मानार्थ हिराबागेंत एक सभा भरविण्यांत आली होती. सभेनंतरच्या उपहारप्रसंगीं त्यांना माधवराव कोठें दिसेनात. तेव्हां तेथील एका स्वयंसेवकास त्यांनीं हंसत विचारलें, " Where is our God Mahadeo " [ आमचा देव महादेव कुठें आहे ]. त्या स्वयंसेवकाला कांहींच कळेना म्हणून तो बुचकळ्यांत पडला.

तेव्हां ह्यूमसाहेबांनीं त्याला परत इंग्रजींत विचारलें, " आमचा देव कोण तें तुला ठाऊक नाहीं ? अरे, आमचा देव म्हणजे महादेव गोविंद रानडे. " तेव्हां कुठें त्या स्वयंसेवकाच्या डोक्यांत प्रकाश पडला. पुढें त्या दोघांची भेट होऊन संभापण वगैरे झालें. पण या प्रकारावरून ह्यूमसाहेबांसारख्या थोर पुढाऱ्यांनाहि माधवरावांच्या-बद्दल किती आदर असे हें दिसून येतें.

## नव्या अर्थशास्त्राचे युगप्रवर्तक

याच १८९२ मध्यें त्यांनीं डेक्कन कॉलेजांत ' हिंदी अर्थशास्त्र ' या विषयावर एक निबंध वाचून अर्थशास्त्राच्या हिंदी मन्वंतराला प्रारंभ करून दिला. यापूर्वी हिंदुस्थानला स्वतःचें असें अर्थशास्त्र असेल ही कोणाला कल्पनाहि नव्हती. फार काय, प्रत्येक देशाला स्वतंत्र अर्थशास्त्र असेल असें आपल्याकडे कोणाला कधीं वाटलेंहि नव्हतें. इतर बाबींप्रमाणें याहि विषयांत आपलेकडील लोक इंग्रजांचेंच बोट धरून मार्ग आक्रमीत होते. पण एका राष्ट्राला जे अर्थशास्त्राचे नियम लागू पडतील ते दुसऱ्या राष्ट्राला लागू पडतीलच असें नाहीं, तर प्रत्येक राष्ट्रांतील परिस्थितीप्रमाणें त्या राष्ट्राचें स्वतंत्र असें अर्थशास्त्र बनलें जातें असें सप्रमाण सिद्ध करण्याचा माधवरावांनीं प्रयत्न केला होता. या व्याख्यानांत अर्थशास्त्राच्या उत्पत्तिविकासाचें

आणि मूलतत्त्वांचें ऐतिहासिक पद्धतीनें आमूलाग्र विवेचन माधवरावांनीं केलें होतें; व अशा तऱ्हेनें हिंदी अर्थशास्त्रांतील एका नव्या युगाची त्यांनीं सुरवात केली. त्यांनीं हा जो हिंदी अर्थ-शास्त्राचा पाया घातला तो फ्रेड्रिक लिस्ट, कॅरेप्रभृति जर्मन आणि अमेरिकन अर्थशास्त्रज्ञांच्या विचारांच्या आधारें घातला. या व्याख्यानांत खुला व्यापार व संरक्षित व्यापार यांचें विवेचन करून व्यक्तिवादी स्पर्धाप्रधान आर्थिक घटना हा आपला आदर्श आहे असें सांगून आपल्या मतें, कंगाल हिंदुस्थानला स्वतंत्र असेंच अर्थशास्त्र असावें असें या व्याख्यानाचे अखेरीस त्यांनीं प्रतिपादिलें होतें.

या त्यांच्या व्याख्यानानें हिंदी अर्थकारणांत त्यांनीं नवें युगच निर्माण केलें असें म्हणणें धाष्ट्र्याचें होणार नाहीं. या वेळपर्यंत केवळ 'इंग्रज ग्रंथकारांना वाट पुसत' अर्थशास्त्राचा अभ्यास आपलेकडील विद्वान् करीत असत. माधवरावांनीं आपल्या व्याख्यानानें त्यांचे डोळे उघडविले व त्यांना स्वतंत्र विचार करावयाचा धडा दिला.

## आणखी दोन मृत्यु

याच वर्षी आणखी दोन मित्रांचे मृत्यु पाहणें त्यांच्या नशिबीं आलें. ते म्हणजे नारायण महादेव परमानंद व काशीनाथ त्रिंबक तेलंग. प्रार्थनासमाजाच्या कार्यांत परमानंद हे त्यांचे सहकारी असून आपल्या परमपवित्र आचारानें ते मित्रमंडळींत 'ऋषि' या अभिधानास पात्र झाले होते.तेलंग हे विद्यार्थी व पुढें न्यायखात्यांतील सहकारी म्हणून माधवरावांचे जिवश्चकंठश्च स्नेही बनले होते. केवळ चाळिशीच्या आसपासच असतां, मानमान्यतेच्या आणि उत्कर्षाच्या माध्यान्हीस ते मृत्यु पावले होते. या दोन मित्रांच्या दुःखामुळें माधवरावांना अनन्यसाधारण दुःख झालें होतें.

## लोकसेवेची ताटातूट असह्य

तेलंगांच्या मृत्यूनंतर त्यांची हायकोर्टाच्या न्यायाधिशाची जागा दोन महिने रिकामीच होती. केवळ योग्यतेच्या दृष्टीनेंच बघावयाचें म्हटलें असतें तर माधवरावांस ती जागा यापूर्वीच मिळावयास हवी होती. पण माधवरावांचें सार्वजनिक कार्य त्यांच्या बढतीच्या आड आलें होतें. " तुम्ही लोकसेवा सोडा, तुम्हांस बढती मिळेल " असे कांहीं गुणग्राही युरोपियन मित्रांचे निरोप आले म्हणजे माधवराव अत्यंत दुःखी होत असत. बढती न मिळण्याबद्दल त्यांना दुःख वाटत नसे तर, ' लोकसेवेची व आपली ताटातूट ' ही कल्पनाच त्यांना असह्य होई. ' लिहूं नका असें सांगणें म्हणजे वांचू नका–मरा–असेंच सांगणें होय. तें मला कसें पत्करेल ? ज्या भावनेनें मी लिहीत आहे, ती जिवांत जीव आहे तोंपर्यंत कायम राहील. बढती न मिळाली तर न मिळो. ' असे उद्गार त्यांनीं आपले मित्र विष्णु मोरेश्वर महाजनी यांचेजवळ याबाबतींत काढले होते.

## न्यायमूर्ति

तेव्हां तेलंगांची जागा कोणाला मिळेल याबाबत लोकांत चर्चा चालली, होती तरी रानड्यांना त्याबद्दल कांहींच वाटत नव्हतें. या बाबतींत कांहींच प्रयत्न न करतां तडक ते आपल्या नेहमींच्या फिरतीच्या कामानिमित्तानें सोलापूरकडे रवाना झाले. या मुक्कामांत सोलापूरकरांनीं माधवरावांचें एक व्याख्यान ठरविलें होतें. हें व्याख्यान कल्पनेपेक्षां लांबलें व व्याख्यानांतील उभें राहण्यानें व त्या वेळीं वारा लागल्याचे निमित्तानें माधवराव आजारी पडले. याच आजारीपणांत हायकोर्ट जज्जाची जागा मिळाल्याचा हुकूम माधवरावांना मिळाला. बरेच दिवस अपेक्षित असलेला हा मान

मिळतांच रमाबाईंना अत्यंत हर्ष झाला असल्यास नवल नाहीं. पण या आनंदाचा माधवरावांचे चेहऱ्यावर मागमूसहि त्यांना आढळला नाहीं. तेव्हां त्यांनीं त्या वेळीं खालील उद्गार मनाशींच काढले, "किती वेडी मी ? अहोरात्र जवळ राहून स्वतःच्या स्वभावाची व सद्गुणांची मला परीक्षा होऊं नये ! ज्या ठिकाणीं दुःखाचा डोंगर कोसळला तरी डगमगावयाचें नाहीं, किंवा सुखदुःखाच्या लाटा येऊन आदळल्या तरी हर्षातिरेक व्हावयाचा नाहीं असा स्वभाव आहे हें मला कां बरें कळून येऊं नये? "

## महादेवोत्सव

न्यायमूर्तींचा मान मिळाल्याचें कळतांच माधवरावांचें आभिनंदन करण्याचा पहिला मान सोलापूरकरांनीं पटकावला. पुढें माधवराव पुणें येथें आले. पुणेकरांच्या आनंदास तर पारावारच नव्हता. त्यांनीं अक्षरशः आठ दिवसांचा 'महादेवोत्सवाचा' कार्यक्रम आंखला होता. या काळांत माधवरावांचा गौरव केला नाहीं अशी एकहि संस्था पुण्यांत नव्हती, आणि माधवरावांच्या गौरवानें ज्याचे हृदयास भरतें आलें नाहीं, असा एकाहि जीव पुण्यांत सांपडला नसता. माधवरावांनीं पण प्रकृति बरी नसतांहि प्रत्येक ठिकाणीं हजर राहून सर्वांस आनंद दिला. समारंभास ते चालले म्हणजे लोक अक्षरशः पुष्पवृष्टि करीत. आपल्यावरील पुणेकरांनीं दाखवलेल्या अकृत्रिम प्रेमाची परत फेड करण्याचा माधवरावांनीं थोडासा प्रयत्न केला. व तो म्हणजे आपल्या आजपर्यंतच्या मिळकतीपैकीं पंचवीस हजारांची रक्कम काढून, त्या रकमेचा एक ट्रस्ट करून, दोन ट्रस्टी नेमून, आपल्या प्रेमांतील औद्योगिक अथवा इतर संस्थांना दरवर्षीं देणगीदाखल मदत त्या रकमेच्या व्याजांतून देण्याची योजना त्यांनीं केली.

पुण्यांतील या उत्सवातिरेकानें माधवरावांच्या उत्सवपराङ्मुख मनाला थोडासा त्रास झाला असल्यास नवल नाहीं. अखेर साऱ्या सन्मानाला ते इतके कंटाळले कीं, एके रात्रीस कोणालाहि न कळवतां त्यांनीं मुंबईस प्रयाण केलें.

## मागें ठेवलेला तेजःकण

माधवरावांनीं मुंबईस प्रयाण केलें खरें, पण आपल्यामागें आपल्या प्रवृत्तीचा, आपल्या सर्वांगीण राजकारणाचा पुरस्कार करण्याची कुवत असलेला एक सत् शिष्य पुणेंकरांना ठेवूनच ते मुंबईस गेले होते. "सूर्य अस्तास जातांना रात्रीं आपली तेजस्विता अग्नीमध्यें ठेवतो असा एक संस्कृत कवींचा संदेश आहे. तद्वत् सूर्यतुल्य माधवरावांनीं पुण्याहून पश्चिम दिशेकडे मुंबईस प्रयाण करतांना आपल्या कर्तृत्वाचा एक तेजस्वी किरण मागें ठेवला होता. "गोपाळ कृष्ण गोखले हाच तो तेजस्वी किरण होय." असें श्री. न. र. फाटक यांनीं आपल्या 'रानडे चरित्रांत' याबद्दल लिहिलें आहे, ते योग्य नाहीं असें कोण म्हणेल? सन १८८४ सालीं बी. ए. होतांच गोपाळराव डेक्कन एज्युकेशन सोसायटींत शिक्षक म्हणून आले. पुढें १८८७ मध्यें माधवरावांची व गोखल्यांची प्रथम ओळख झाली. या वेळीं गोखले अवघे एकविस वर्षांचे होते. हुशारी, तरतरी, उत्साह, काम करण्याची हौस व कळकळ आणि जबाबदारीची जाणीव हे त्यांच्या अंगांतील गुण दृष्टीस पडतांच माधवरावांनीं त्यांना हातास धरलें. प्रथम सार्वजनिक सभेच्या कामांत गोपाळराव माधवरावांस मदत करूं लागले. सार्वजनिक सभेमार्फत निघणाऱ्या नियतकालिकांचे कांहीं काळ

गोपाळराव संपादक होते. " न्या. मू. रानडे यांनीं मला हाताशीं



धरलें व त्यांच्या पायांशीं बसून शिकण्याची संधि मला आली, म्हणूनच मला आज ही स्थिति प्राप्त झाली आहे" असे उद्गार कौन्सिल-निवडणुकींत यश मिळाल्या-वर झालेल्या अभिनंदनाच्या सभेंत १८९९ मध्यें काढले होते. आणि खरोखर गोपाळरावांनीं माधव-रावांच्या शिकवणुकीनेंच आजन्म देशसेवेचें व्रत स्वीकारलें, व अखेरपर्यंत चालाविलें.

## न्यायमूर्ति–पदारोहण

ता. २३ नोव्हेंबर १८९३ रोजीं माधवरावजींनीं न्यायमूर्तीच्या जागेवर आरोहण केलें. कोठलेंहि काम अत्यंत जबाबदारीनें करा-बयाचें, हा माधवरावांचा स्वभावगुणच असल्यानें नवी जबाबदारी त्यांनीं योग्य रीतीनें पार पाडली असेल यांत काय नवल? माधवरावजी इतक्या कर्तव्य बुद्धीनें आपलें काम करीत कीं, प्रसंगीं ते आपल्या प्रकृतीची हेळसांड करीत, पण समाधान होईपर्यंत कोर्टाचें काम झाल्याशिवाय जागेवरून देखील हालत नसत. न्यायमूर्ति म्हणून माधवरावांनीं जीं कामें केलीं त्यामुळें–त्यांच्या इतर अनेक कामां-प्रमाणेंच–त्यांची बुद्धिमत्ता आणि कर्तृत्व यांचें चांगलेंच तेज पडलें.

## सार्वजनिक कार्याचा विस्तार

न्यायमूर्ति झाले म्हणून त्यांचें सार्वजनिक कार्य थांबलें नव्हतेंच. पुण्याप्रमाणें मुम्बईसहि कोर्टाच्या कामाव्यतिरिक्त सारा वेळ सार्वजनिक कार्याकडे ते खर्च करीत असत.

त्याप्रमाणें, काँग्रेस व सामाजिक परिषद यांमध्येंहि पूर्वीप्रमाणेंच त्यांची मदत होत असे. सरकारी नोकरीमुळें काँग्रेसच्या कार्यांत प्रत्यक्षपणें त्यांना भाग घेतां येत नसे. पण जेथें काँग्रेस तेथेंच सामाजिक परिषद भरत असे. त्यामुळें काँग्रेसच्या अधिवेशनाचे वेळीं परिषदेच्या निमित्तानें माधवराव हजर असतच. व त्यांच्या सल्लामसलतीचा फायदा काँग्रेस पुढाऱ्यांना मिळाल्याशिवाय रहात नसे.

## सामाजिक परिषद् मंडपवाद

संमतिवयाच्या वादापासून सुधारक व सनातनी यांमध्यें जो वाद निर्माण झाला तो दिवसेंदिवस वाढतच जाऊन हें प्रकरण हळूहळू विकोपास जाऊं लागलें. १८९० सालापासून सामाजिक परिषदेमध्येंहि दुफळी माजविण्याचा प्रयत्न करण्यांत आला होता, ही गोष्ट वर आलीच आहे. याच वेळेपासून काँग्रेसच्या मंडपांत ही सामाजिक परिषद भरली जाऊं नये अशी टूम सनातनी लोकांनीं काढली. पण तिला सुरवातीस कोणींच थारा दिला नाहीं. १८९५ मध्यें पुणें येथें काँग्रेस भरावयाची होती व सनातनी लोकांचा बालेकिल्ला पुणें हाच असल्यामुळें आतां आपण वाटेल तें करूं शकूं, ही पुणेंकरांना, पर्यायानें सनातन्यांना घमेंड वाटत होती. या वेळीं या सनातन्यांचे पुढारी लो. टिळक हे होते. त्यामुळें तर या सनातन्यांना फारच शेफारल्यासारखें वाटत होतें. श्रीधर विठ्ठल दाते

हे गृहस्थ या वेळीं या सनातनी पक्षाकडे असून आपल्या गुंडगिरी-बद्दल बरेच प्रसिद्ध होते. " सामाजिक परिषद् कॉंग्रेसच्या मंडपांत भरविली तर आपण मंडपास आग लावल्याशिवाय राहणार नाहीं. असा या दात्यांनीं माधवरावांचे समोर प्रलाप काढला, येवढेंच नाहीं तर, " मंडपाला आग लागणार असल्यानें आपल्या बायका-मुलांना परिषदेच्या ठिकाणीं नेऊं नका " असा सल्ला देण्यासहि त्यांनीं कमी केलें नाहीं. यावर दात्यांच्या अपेक्षेप्रमाणें किंचितंहि न उसळतां माधवरावांनीं शांतपणें उत्तर दिलें, "याचा विचार आम्हीं पूर्वींच केला आहे. आम्ही बायकामंडळींसह मंडपांत येणारच. तुम्हांला याबद्दल कांहींच वाटावयास नको. कारण मांडवाच्या आगींत सांपडून तुमच्या डोळ्यांत सलणारे सुधारक आपल्या अंडयापिलांसह जळून खाक होतील. यांत तुमचा फायदाच आहे, मग उगीच कटकट राहणार नाहीं तुमचे मागें. "

तरी पण पुढें प्रकरण फारच थराला जाणार असें वाटल्यावरून माधवरावांनीं आपला बेत बदलला. व सामाजिक परिषद फर्ग्युसन कॉलेजांत बांधलेल्या स्वतंत्र मंडपांत भरविण्यांत आली. पण परिषद् कॉंग्रेसबरोबर भरविली जाऊं नये ही सनातन्यांची इच्छा मात्र सफळ झाली नाहीं. दरसाल नियमानें कॉंग्रेसबरोबर सामाजिक परिषदेचें कामहि चालू होतेंच. १८९७ सालीं उमरावती येथें कॉंग्रेस व परिषदेचें अधिवेशन एकत्र भरविण्यांत आलें होतें. आपल्या ह्यातीपर्यंत माधवराव सामाजिक परिषदेमध्यें मोठ्या हुरूपानें भाग घेत असत. सामाजिक परिषदेमधील माधवरावांचीं सगळींच भाषणें नुसतीं वाचण्याजोगींच नसून त्यांचा सखोल अभ्यास करण्या-इतकीं महत्त्वाचीं आहेत.

## बडोद्याची दिवाणगिरी

सन १८९६ सालीं माधवरावांना सयाजीरावांनीं आपली दिवाणगिरी पत्करण्याविषयीं विचारलें होतें. यापूर्वींहि दोनदां या बाबतींत माधवरावांना विचारण्यांत आलें होतें. पण आपल्या स्नेह्यासोबत्यांशीं विचारविनिमय करून संस्थानी नोकरी पत्करूं नये असें त्यांनीं ठरविलें होतें. यावेळींहि महाराजांना माधवरावांनी सविनय-नकार दिला. पण या नकाराबरोबरच त्या पत्रांत संस्थानी राज्यकारभार व तो कसा चालवावा याबाबत सविस्तर रीतीनें आपला अभिप्राय कळविला होता.

## डेक्कन सभेची स्थापना

याच वर्षीं पुणें येथें सार्वजनिक सभेच्या कारभारांत मोठी ढवळाढवळ झाली. टिळक आणि त्यांचे सहकारी यांनीं सार्वजनिक सभेंत आपलें मताधिक्य वाढवून ती सभा आपल्या मतानुवर्ति केली. माधवरावांनीं तयार केलेल्या आणि त्यांच्या मताप्रमाणें वागणाऱ्या माऱ्यांची सार्वजनिक सभेंतून हकालपट्टी झाली हें अनुमान यावरून निघतेंच. आपण स्थापन केलेल्या, व अनेक वर्षें जोपासून नांवारूपास आणलेल्या आपल्या संस्थेंतून आपल्या अनुयायांची हकालपट्टी झाली हें पाहून माधवरावांना वाईट वाटलें. लगेच त्यांनीं त्याच वर्षीं पुणें येथें ' डेक्कनसभा ' या नांवाची संस्था काढली. आपल्या अनुयायाना यापुढें कार्य करण्यास वाव मिळावा म्हणूनच ही संस्था आपण काढली, असें माधवरावांनीं स्पष्ट केलें होतें. तरी पण टिळक माधवरावांच्या या नव्या उद्योगावर इतके चिडले होते कीं, केसरींतून हा ' म्हातारचळ कीं पोरखेळ ' या अग्रलेखांत त्यांनीं माधवरावांच्या या प्रवृत्तीवर खूप टीका केली होती.

न्यायमूर्तीची जबाबदारीची कामगिरी करीत असतांहि माधवरावांच्या इतर सार्वजनिक कार्यांत बिलकुल खंड पडला नव्हता. दरवर्षी नेहमींप्रमाणें सभा-संमेलनें, व्याख्यानें हीं चाललेलींच असत. मुंबई येथें येतांच इतिहास विषयाचा माधवरावांनीं व्यवस्थित रीतीनें अभ्यास सुरू केला होता. मराठ्यांच्या इतिहासावर एकादें मोठें पुस्तक लिहिण्याचा त्यांचा बरेंच वर्षांचा मानस होता, तो सन १९०० मध्यें सिद्धीस गेला. 'मराठयांच्या सत्तेचा उत्कर्ष' हें त्यांचें इंग्रजी पुस्तक याच वर्षी प्रसिद्ध झालें.

## शेवटचें आजारीपण

तरी पण एवढ्या प्रचंड खटाटोपांत त्यांची प्रकृति दर वर्षी बिघडूं लागली. देहाचें सामर्थ्य प्रतिवर्षी कमी कमी होत गेलें. एका दुखण्यांत तर त्यांची स्मरणशक्तीच नाहींशी झाली होती. मग रमाबाईनीं अत्यंत काळजीपूर्वक त्यांची शुश्रूषा करून गाडें पूर्वपदावर आणण्याची शिकस्त केली होती. आजारी पडतांच रजा घ्यावी लागे व मग ते थंड हवेच्या ठिकाणी जात असत. पुढें प्रकृति सुधारल्यासारखी वाटे, मग लगेंच ते आपल्या कामास लागत. मध्यंतरी १८९८-९९ चे सुमारास मुंबईत प्लेगनें कहर मांडला होता. प्लेगनंतर त्यांना एक चमत्कारिक रोग जडला. दररोज रात्रीं साडेदहाच्या ठोक्याला, प्राणांतिक अवस्था करणारा स्पॅझमचा झटका येण्याचा विकार त्यांना लागला. याच झटक्यानें त्यांचा झपाट्यानें शक्तिक्षीण होऊं लागला. पुढें पुढें तर लवकरच आपण हा लोक सोडून जाणार अशी माधवरावांची खात्री झाल्याप्रमाणें ते वागावयास लागून, निरवानिरवीच्या गोष्टी बोलूं लागले होते.

## अखेर

अशा परिस्थितींत १९०१ चा जानेवारी महिना उजाडला. त्या वर्षींच्या लाहोर कॉंग्रेसला आजारीपणामुळें त्यांना हजर राहतां आलें नव्हतें. याबद्दल त्यांना फारच वाईट वाटत होतें. कॉंग्रेसपेक्षां सामाजिक परिषदेबद्दल त्यांना फार काळजी वाटत असे. त्या वर्षींची सामाजिक परिषदहि यशस्वी झाल्याची तार वाचून त्यांना अत्यंत समाधान वाटलें. परिषदेच्या स्थापनेपासून फक्त यंदाच ते गैरहजर होते. रोज रात्रीं काळजांत कळ येण्याचा प्रकार होतच होता. ता. १४ जानेवारी रोजीं पायांवर सूज आली. पायांला जडत्व आलें असें वाटूं लागलें. तरी पण ता. १६ जानेवारी रोजीं नेहमींपेक्षां बरीच हुषारी वाटत असल्याचे त्यांनीं बोलून दाखविलें. नेहमींप्रमाणें त्यांनीं थोडेंसें कामहि केलें. कामानंतर रमाबाईंच्यासह ते फिरावयास गेले. फिरून येतांच त्यांचे मित्र जयपूरचे दिवाण कांतिचंद्र मुकर्जी मरण पावल्याची तार त्यांना मिळाली. तार वाचतांच त्यांचे तोंडून "छान, काम करतां करतां मरण्यांत सुख असतें" असे उद्गार बाहेर पडले. रात्रीं जेवणाकरतां पानावर बसले खरें, पण त्यांस अन्न गेलें नाहीं. जेवणानंतर आपल्या बहिणीकडून कांहीं आवडते अभंग म्हणवून घेतले. थोडया वेळानें स्वतःच वाचण्याकरतां एक पुस्तक घेतलें, तोंच रोजची कळ आली. त्या दिवसाची कळ फारच जोराची होती. बराच वेळ थांबेना आणि—आणि याच वेळीं त्यांचें प्राणोत्क्रमण झालें.

झालें. साऱ्या भारतवर्षाला ललामभूत झालेला हा तेजस्वी दिवा अशा रीतीनें विझला; आणि आपल्या मागें आपल्या देशाला गर्द अंधारांत व दुःखांत लोटून दिलें.

## स्वभावाचें धांवतें दर्शन

येवढा वेळपर्यंत माधवरावजींच्या जीवनाचें धांवतें दर्शन आपण घेतलें. कोल्हापुरांतील उनाड मुलाच्या जीवनापासून तों न्याय-मूर्तींच्या आसनावर अधिष्ठित होऊन अत्युच्चीं पदिं पोंचलेल्या स्थितीपर्यंत आपण सारे प्रसंग पाहिले. पण जीवनाच्या या धका-धकीच्या प्रसंगांत त्यांच्या स्वभावाचे आपणांस फारसें ज्ञान झालें नसावें. म्हणून येथें आतां थोडक्यांत त्यांच्या स्वभावांतलि कांहीं पैलू आपण पाहूं.

माधवरावांच्या स्वभावांतील पहिला विशेष म्हणजे त्यांचा साधे-पणा. पोषाखांतील आणि आचारांतील साधेपणा त्यांचेमध्यें अत्यंत पराकोटीला गेलेला दिसून येई. त्याचप्रमाणें मानापमानांच्या कल्पनांचा त्यांनीं पूर्णपणें त्याग केलेला होता. आप-ल्याला मानाच्या पानावर बसवलं तरच त्या कामांत लक्ष घालायचं कुणीं मंदिर बांधायला काढलं तर दगड दुसऱ्यांनीं वाहून आणावेत आणि आपण कळस बसाविण्यापुरतं पुढें यावं अशी पुष्कळांची वृत्ति असते. पण मानापमानाच्या भलत्या कल्पनांनीं त्यांचं मन कधींच भारावलं नव्हतं. तें मंदिर बांधून लोकांचं कल्याण होत असेल तर स्वतःची पाठ हुळुहुळी होईपर्यंत पाठीवरून दगड वाहून आणावयाची सुद्धां त्यांची तयारी असावयाची. असा माधवरावांचा स्वभाव होता.

त्याचप्रमाणें त्यांची वृत्ति नेहमीं शांत असे. माधवराव कधीं कोणाशीं तुसडेपणानें वागले असं उभ्या जन्मांतहि कधीं झालं नसेल. राग तर त्यांच्या स्वभावाला माहीतच नव्हता जसा कांहीं. सदोदित डोक्यावर बर्फ ठेवल्यासारखी वृत्ति. यांच्यासंबंधीं कुणी कांहींहि वेडेंवाकडें बोलो,त्यांच्या तोंडून त्या माणसाची निंदानालस्ती

कधींच ऐकूं यावयाची नाहीं. 'ज्वालामुखी भडकला तर त्यांतून तापलेला रस बाहेर येतो, पण हिमालय तापला तर थंड पाण्याच्या रसाशिवाय त्यांतून दुसरं काय उत्पन्न होणार ?'

अहंबुद्धीचा त्यांच्यामध्यें पूर्णपणें अभाव होता. मीं 'अमुक केलें' असें एकदांहि ते कधीं बोलले नसतील. पण दुसऱ्याच्या अगदीं यत्किंचित् गुणाचेंहि ते कौतुक केल्याशिवाय रहात नसत, आणि या त्यांच्या गुणांमुळेंच त्यांनीं प्रचंड असा लोकसंग्रह करून अनेकांना कार्यप्रवण केलें होतें. योजकता हा त्यांचा गुण तर इतक्या प्रकारांनीं फळाला आला कीं, माधवरावांनीं स्थापिलेल्या अनेक संस्था थोडक्याच काळांत नांवारूपाला येऊन कार्य करूं लागत असत. 'या सर्वांबरोबरच माधवरावांनीं आपल्या स्वभावांतून निराशेची पूर्णपणें हकालपट्टी केली होती. त्यांच्या अंतर्दृष्टींत अविनाशी प्रकाश सांठला होता. प्राप्तकालाच्या पलीकडे त्यांच्या दृष्टीची गति असल्यामुळें चालू घडीचा कठोर अनुभव त्यांच्या बुद्धीली निराशेच्या अंधारकोठडींत कोंडून ठेवूं शकत नव्हता. निराशेची कोंडी फोडून तिच्या व्यापापलीकडचा सदुद्योगफलाच्या प्रभामय प्रदेशाचा किनारा त्यांच्या दृष्टीला स्पष्ट दिसे. सामान्य माणसें अडचणींच्या टापूंत सांपडलीं कीं त्यांची गाळण उडते व या टापूंतच आपल्या कारभाराचे ताबूत थंड होणार अशा निराशेनें ते माघार घेऊं लागतात. या अडचणींच्या टापूंना अंत आहे, व धीरानें न गांगरतां आपल्या स्वीकृत कार्यांत मग्न राहिल्यास तो अंत लवकर येतो, ही जाणीव गांगरून जाणाऱ्यांना रहात नाहीं. माधवरावांच्या स्वभावांत हा दोष असतां तर माधवरावांना लोकाग्रणी होण्याचा मान मिळालाच नसता.'

माधवरावांच्या स्वभावाची आणखी एक बाजू दाखविली नाहीं तर त्यांच्या स्वभावाचें वर्णन कधींच पुरें होणार नाहीं. आणि ती

म्हणजे त्यांची धार्मिक मनोवृत्ति. पुण्याच्या लायब्ररींत बसले असतां ज्ञानोबा–तुकारामाच्या पालखीचा सोहळा बघून त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहात असतांना एकदां त्यांच्या मित्रांनीं पाहिल्या होत्या. हेंच त्यांच्या स्वभावाचें खरें गमक होतें. दररोज पहांटे तीन सव्वा-तीन वाजतांच त्यांची झोप पुरी होई. प्रथम अंथरुणांतच ईश्वराचें मनन चाले, पुढें उठून तुकारामाचे अभंग म्हणून टाळ्या अगर चुटक्या वाजवीत स्वतःशीं ते रंगून भजन करीत. देवाशीं अत्यंत सलगी केलेले नामदेवाचे भक्तिपर अभंग ते पुनः पुनः घोळून म्हणत. अशा वेळीं पुष्कळ वेळां त्यांचा कंठ दाटून येई, डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागत आणि मग तल्लीनतेमध्यें मनाला येतील ते कधीं कधीं स्वतंत्र अभंगच ते म्हणूं लागत. “ अशा वेळीं सकाळच्या संधिप्रकाशाच्या शांत उजेडांत हें भक्तिपूर्ण मुख फारच प्रेमळ दिसून माझें मन सद्गदित होई आणि स्वतःबद्दल प्रेम व पूज्य बुद्धि आपोआप वाढे. ” असें रमाबाईनीं लिहून ठेविलेंच आहे. आणि कोणाच्याहि मनांत त्यांचे वरील वर्तन वाचून त्यांचेबद्दल पूज्य बुद्धि वाढेल यांत संशय नाहीं. माधवरावांच्या स्वभावांतील निरनिराळ्या पैलूं पैकीं त्यांच्या या भक्तिप्राधान्य स्वभावाला जर कोणी विशेष महत्व दिलें तर त्यांत कांहींहि अतिशयोक्ति होणार नाहीं.

## ‘ सर्वज्ञः स हि माधवः ’

“ महाराष्ट्र देशांत अठराव्या शतकांत नाना फडणिसासारखे मुत्सद्दी होऊन गेले खरे; पण विद्वत्तेचें मान लक्षांत आणतां त्यांची व माधवरावजींची तुलना करण्यापेक्षां महाराष्ट्राच्या किंवा दक्षिणेच्या प्राचीन इतिहासांत प्रसिद्धीस आलेले हेमाद्री किंवा माधवाचार्य यांचीच उपमा आमच्या मतें माधवरावजींस साजण्यासारखी आहे. माधवाचार्यांची बुद्धि चोहोंकडे अकुंठित असल्यामुळें त्यांस ‘ सर्वज्ञ

स हि माधवः ' असें म्हणत असत. माधवरावजींचें बुद्धिवैभवाहि असेंच विस्तृत व व्यापक होतें. " असे लो. टिळकांनीं त्यांचेबद्दल काढलेले उद्गार यथार्थ नाहींत असें कोण म्हणेल ? पारतंत्र्यांत खित-पत पडलेल्या देशाला सर्व बाजूंनीं जागें करून चेतना दिल्या-शिवाय त्याची उन्नति होणें शक्य नाहीं असें माधवरावजींचें ठाम मत होतें. म्हणूनच त्यांनीं आपल्या 'सर्व ठिकाणीं अकुंठित' अशा प्रचंड बुद्धिमत्तेच्या जोरावर निरनिराळ्या चळवळींचा जो कांहीं सपाटा उडवून दिला तो अपूर्व होता यांत शंका नाहीं. सनदशीर राजकीय चळवळी, आर्थिक, औद्योगिक, सामाजिक व धार्मिक या सर्व बाबी नव्या दृष्टीनें लोकांपुढें मांडून त्यांना जागृत करण्याचें काम माधव-रावांनींच केलें.

आणि या सर्व गोष्टी अशा कांहीं उमेदीनें माधवरावांनीं केल्या कीं जणूं कांहीं आपल्या राष्ट्राचा लौकरच अभ्युदय होणार आहे अशी त्यांची मनोमन खात्री होती; व म्हणून या येणाऱ्या अभ्यु-दयाचें स्वागत करण्यासाठींच जणूं ते राष्ट्राला सर्व बाजूंनीं कार्यक्षम करीत होते. आज आपल्या राष्ट्रांत जो कांहीं जोम आणि तेज आढळून येत आहे, आपल्या राष्ट्रांतील लोक निर्भयपणें जी राष्ट्र-सेवा करीत आहेत ते माधवरावजींच्या अखंड तपश्चर्येचें फळच आहे असें म्हणण्यांतच माधवरावजींची खरी योग्यता वर्णन करतां येईल. ना. गोखले यांनीं एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें " त्यांच्या रूपानें मानवजातीला तिच्या चुकीच्या मार्गावरून खऱ्या मार्गावर आणणाऱ्या व कठिण प्रसंगीं त्या त्या देशाला नवा मार्ग दाखवि-णाऱ्या परमेश्वरानें आपल्या देशांत अवतार घेतला असावा " असें खऱ्या भक्तिभावानें त्यांच्या चरित्राकडे पाहिल्यावर वाटल्याशिवाय राहात नाहीं. आणि मग मनाला वाटतें, ' झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु, परंतु यासम हा. "

# परिशिष्ट १ लें.

| अखिल भारतीय, विशेषतः महाराष्ट्रीय प्रसिद्ध घडामोडी. | सन | न्या. मू. माधवराव यांचे आयुष्यांतील महत्त्वाचे प्रसंग. |
|---|---|---|
| | १८४२ | जन्म, निफाड येथें ( १८-१-४२ ) |
| ' ज्ञानप्रकाश ' सुरू. | ४९ | |
| विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा जन्म. | ५० | |
| मुंबईस पहिली कापसाची गिरणी. | ५१ | इंग्रजी शिक्षणास सुरुवात. |
| | ५२ | |
| हिंदुस्थानांतील पहिली आगगाडी (मुंबई ते ठाणें) सुरू | ५३ | |
| | ५४ | |
| मुंबई विद्याखातें स्थापना. | ५५ | |
| लो॰ टिळक व आगरकर यांचा जन्म.<br>विधवाविवाह कायदा. | ५६ | |
| हिंदी स्वा. संग्राम, मुंबई युनिव्हर्सिटीची स्थापना. | ५७ | मुंबईस प्रयाण व इंग्रजी शिक्षण पुढें चालू. |
| गु. अण्णासाहेब कर्वे यांचा जन्म. | ५८ | कॉलेज प्रवेश ( एल्फिन्स्टन ) |
| | ५९ | मॅट्रिक. |

| | | |
|---|---|---|
| | १८६० | |
| | ६१ | |
| मुंबई युनिव्हर्सिटीचे पहिले बी. ए. (वामन आबाजी मोडक, रानडे, डॉ. भांडारकर, बाळ मंगेश वागळे इ.) | ६२ | बी. ए. पहिला वर्ग. अध्यापनास सुरुवात, इन्दुप्रकाशाचे संपादक |
| ‘शालापत्रक’ मासिक सुरू. | ६३ | |
| | ६४ | एम्. ए. पहिला वर्ग. |
| | ६५ | |
| मुं. यु. चे पहिले एल्एल्. बी. (रानडे, वागळे.) ना. गोखले जन्म. | ६६ | वकिलीची परीक्षा, वकिली सुरू. ओरिएंटल ट्रान्सलेटर, अक्कलकोट, येथें कारभारी, कोल्हापूर येथें. न्यायाधीश. |
| मुंबई प्रार्थना समाजाची–स्थापना | ६७ | |
| | ६८ | प्रोफेसरीची सरकारी नोकरी. |
| मुंबई येथील पहिला पुनर्विवाह. म. गांधी जन्म. | ६९ | |
| पुणें येथील पुनर्विवाहविषयक वाद. | ७० | |
| पुणें प्रार्थनासमाज व सार्वजनिक सभा स्थापना. | | |
| विष्णुबुवा ब्रह्मचारी मृत्यु (ज. १८२५) | ७१ | ॲड्व्होकेटची परीक्षा पास. पुणें येथें सदर अमी- |
| | ७२ | नच्या जागेवर नेमणूक. |
| सत्यशोधक समाजाची स्थापना. | ७३ | प्रथम पत्नीचा मृत्यु व द्वितीय विवाह. |

| | | |
|---|---|---|
| | १८७४ | रानडे यांचा जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीचा अर्ज. |
| मल्हारराव होळकर पदच्युतिप्रकरण. | ७५ | दयानंद गर्दभानंद प्रकरण. |
| विष्णुशास्त्री पंडिताचा मृत्यु. | ७६ | |
| महाराष्ट्रांतील दुष्काळ, व्हिक्टोरिया राणी हिं. ची सम्राज्ञी हा किताब घेते. | ७७ | नाशकास बदली. |
| वर्तमानपत्राच्या मुस्कटदाबीचा कायदा पहिले मराठी ग्रंथकार व साहित्यसमेलन, पुणे. | ७८ | नाशिक येथील सार्वजनिक कार्य. |
| | ७९ | वासुदेव बळवंत यांचे बंड पेशव्यांच्या वाड्यास आग. धुळ्यास बदली. |
| सार्वजनिक काकांचा मृत्यु. न्यू. इं. स्कूल स्थापना | ८० | |
| 'केसरी–मराठा' सुरू. | ८१ | मुंबई प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट. |
| विष्णुशास्त्री चिपळोणकर मृत्यु. | ८२ | पुणे येथे प्रिंसिपल सदर अमीनच्या जागेवर बदली. |
| इलबर्ट बिल, वासुदेव बळवंत मृत्यु (ज.१८५५) | ८३ | |
| हुजुरपागा शाळा स्थापना, फर्ग्युसन कॉलेज स्था. | ८४ | |
| कॉंग्रेस स्थापना. | ८५ | कौन्सिलांत नामदार. |
| | ८६ | रखमाबाई प्रकरण. फिनॅन्स कमिटीवर नेमणूक. |

| | | |
|---|---|---|
| | १८८७ | सामाजिक परिषदेची स्थापना. C.I.E. पदवी. |
| सुधारक सुरू | ८८ | |
| . | ८९ | |
| जोतिबा फुले मृत्यु (ज. १८२८). | ९० | औद्योगिक परिषद स्थापना. |
| संमतिवयाचा कायदा पास, स्वदेशीची चळवळ. | ९१ | पंचहौद मिशन ग्रामण्य प्रकरण, करमाळें येथील दुखणें. |
| लोकहितवादींचा मृत्यु. ( ज. १८२३ )<br>वामन शिवराम आपटे मृत्यु. ( ज. १८५८ )<br>दादाभाई नैरोजी पार्लमेंटचे मेंबर. | ९२ | ' हिंदी अर्थशास्त्रावरील निबंध ' प्रसिद्ध. |
| काशिनाथ त्रिंबक तेलंग मृत्यु. | ९३ | न्यायमूर्ति. |
| | ९४ | |
| आगरकर मृत्यु. | ९५ | सामाजिक परिषदेचा मंडपवाद. |
| शिवाजी–उत्सव सुरू. | ९६ | ' डेक्कन सभा ' स्थापना. |
| प्लेग व दुष्काळ. रँड–आयर्स्ट खून, गोखले माफीप्रकरण | ९७ | |
| | ९८ | |
| | ९९ | |
| मुंबई इलाख्यांतील दांडगा दुष्काळ. | १९०० | ' राइझ ऑफ दि मराठा पॉवर ' प्रसिद्ध. |
| व्हिक्टोरिया राणीचा मृत्यु. | १९०१ | मृत्यु. (१६–१–१९०१) |

परिशिष्ट २ रें

# माधवरावांची प्रभावळ

## [ माधवरावांच्या कांहीं मित्रमंडळींचा अल्प परिचय ]

### १. विनायक जनार्दन कीर्तने [ १८४० ते १८९१ ]

यांचें शिक्षण कोल्हापूर व मुंबई येथें माधवरावांच्या समवेत झालें. कॉलेजांत ते फारसे चमकले नाहींत. येवढेंच नव्हे तर मधेंच कॉलेज सोडून १८६२ मध्यें त्यांनीं शिक्षकाची नौकरी पत्करली. १८६५ सालीं ते इंदूर संस्थानांत प्रथम विद्याखात्यांत शिरले. पुढें तेथेंच न्यायखात्यांत गेले. १८७३ सालीं ते बडोदें संस्थानांत नौकरीस गेले, तेथेंच ते १८७५ मध्यें नायब दिवाण झाले होते. विनायकराव हे एक कसलेले मराठी लेखक होते. त्यांचीं 'जयपाळ' व 'माधवराव' हीं दोन नाटकें प्रसिद्ध आहेत. सन १८८६ मध्यें बडोद्याची नोकरी सोडून, ते कांहीं दिवस इंदुरास दिवाण झाले होते. पुढें ते पुण्यास येऊन राहिले होते. सन १८९१ मध्यें मधुमेहाचे विकारानें ते वारले.

### २. बाळ मंगेश वागळे [ १८३८ ते १८८७ ]

हे कॉलेज–शिक्षणांतील कालांतील माधवरावांचे मित्र असून माधवरावांचे बरोबरच यांनीं बी. ए., एम्. ए. व एलएल्. बी.च्या पदव्या संपादन केल्या होत्या. पुढें प्रार्थना–समाजाच्या कार्यामुळें ते एकमेकांच्या अधिकच जवळ आले. प्रार्थना–समाजाच्या संस्थापकांपैकीं हे एक असून आमरणान्त त्यांनीं प्रार्थना–समाजाची चांगली सेवा केली.

## ३. शंकर पांडुरंग पंडित [ १८४०–१८९४ ]

सावंतवाडींतील कुडाळ पेट्यांतील बांबुळी गांवीं यांचा जन्म झाला. त्यांचे वडील त्या गांवचे कुलकर्णी होते. त्यांचें प्रथम फारसें शिक्षण झालें नव्हतें. कुलकर्णीपणास जें काय लागेल तेवढें शिकल्या-वर ते कुलकर्णीपणाचें काम पाहूं लागले. पण त्यांचें महत्त्वाकांक्षी मन या कामांतच त्यांना स्वस्थ बसूं देईना. एके ठिकाणीं कारकु-नाची नौकरी मिळवावयाच्या प्रयत्नांत असतां त्यांचा अपमान झाला. त्यामुळें चिडून त्यांनीं घरदार व कुलकर्णीपण सोडून आतां शिकावयाचें या निश्चयानें बेळगाव गांठलें. वयाच्या अठराव्या वर्षीं इंग्रजीचा गंध नसलेल्या शंकररावांनीं अवघ्या तीन वर्षांत मॅट्रिक परीक्षा दिली. आणि तीसुद्धां अत्यंत हालांत व दारिद्र्यांत दिवस काढून. यावरून त्यांच्या कुशाग्रबुद्धीची कल्पना येते. सन १८६८ त ते लॅटिन व इंग्रजी घेऊन एम. ए. झाले. बी. ए. होतांच त्यांनीं नौकरी धरली होती. प्रथम त्यांना दक्षिणा प्राइज कमेटीचे सेक्रेटरी नेमण्यांत आलें होतें; पुढें डेप्युटी कलेक्टरच्या जागेवर त्यांना नेमण्यांत आलें होतें. सन १८७९ मध्यें त्यांना ओरिएंटल ट्रान्स्लेटरच्या जागेवर नेमण्यांत आलें होतें. याच जागेवर ते सहा वर्षें होते. पुण्यांतील फीमेल हायस्कूल काढण्याचे कामीं त्यांनीं फारच श्रम घेतले होते. याच शाळेच्या संमेलन-प्रसंगीं त्यांचेवर एका क्षुल्लक कारणामुळें सरकारी इतराजी ओढवली होती व म्हणून १८८५ मध्यें त्यांची कांहीं दिवस नौकरीहि गेली होती. पुढें माधवरावांचे खटपटीमुळें त्यांना परत नौकरीवर घेण्यांत आलें. पुढें त्यांना पोरबंदर येथें ॲडमिनिस्ट्रेटर नेमण्यांत आलें होतें. तेथेंच त्यांना मृत्यु आला.

## ४. सर डॉ. भांडारकर [ १८३७–१९२५ ]

डॉ. भांडारकरांचें नांव व कर्तबगारी ठाऊक नाहीं असा एकहि माणूस या महाराष्ट्रांत असणें शक्य नाहीं.

त्यांचा जन्म मालवण येथें झाला व इंग्रजी शिक्षण रत्नागिरी येथें झालें. १८५३ सालीं ते पुढील अभ्यासासाठीं मुंबईस आले. १८५८ सालीं त्यांचा कॉलेजांतील अभ्यासक्रम संपला. प्रथम प्रिन्सिपालच्या कारकुनाचें काम केल्यावर १८५९ मध्यें त्यांना फेलो म्हणून नेमण्यांत आलें व १८६० मध्यें त्या वेळच्या पूना कॉलेजमध्यें त्यांची बदली झाली. यावेळीं ते फेलोच होते. सन १८५७ मध्यें मुंबई युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यावर त्यांना १८५९ मध्यें मॅट्रिक ( प्रवेश ) परीक्षेंत बसावें लागलें. १८६२ मध्यें ते बी. ए. झाले व १८६३ मध्यें एम्. ए. झाले. प्रथम ते हैद्राबाद ( सिंध ) येथील शाळेचे हेडमास्तर म्हणून गेले. पण शाळाखात्या-पेक्षां मुलकीखात्याकडे नौकरी करावी असेंच त्यांना वाटत होतें. पण त्यांच्या शिक्षकांनीं शाळाखात्यांतच राहण्याबद्दल त्यांना सांगितलें. पुढें १८६५ ते १८६८ पर्यंत ते रत्नागिरी येथें सरकारी शाळेचे हेडमास्तर होते. १८६८ मध्यें संस्कृत भाषेचे प्राध्यापक म्हणून त्यांस एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें आणलें. सन १८८२ सालीं त्यांना डेक्कन कॉलेजमध्यें आणण्यांत आलें. तेथेंच ते १८९३ पर्यंत काम करीत होते. याच वर्षी त्यांनीं पेन्शन घेतलें.

एक संस्कृत पंडित, पुराण–वस्तुसंशोधक म्हणून त्यांची ख्याति आहेच. पण प्रार्थना–समाजाचेहि एक आधारस्तंभ होते.

सन १८९३सालीं ते मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हाइस चॅन्सेलर झाले. सन१८८५ सालीं गॉटिंजन या जर्मन युनिव्हर्सिटीनें त्यांना Ph.D पदवी दिली होतीच. १९०४ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीनें त्यांना

एल्. एल्. डी. ही पदवी दिली होती. त्याचप्रमाणें कलकत्ता व एडिंबरो या युनिव्हर्सिट्यांनींहि त्यांना याच पदव्या दिल्या होत्या. सरकारनेंहि त्यांना सन १९११ मध्यें K.C.I.E. ही पदवी देऊन भूषविलें होतें.

सन १९१७ मध्यें पुणें येथें त्यांचे सन्मानार्थ 'भांडारकर प्राच्यविद्या संशोधन–मंडळ' स्थापन करण्यांत येऊन या विद्वत्‌रत्नाचें स्मारक करण्यांत आलें.

ते एक मोठे समाज–सुधारक होते. स्त्रीशिक्षणाचे बाबतींतहि त्यांनीं बरीच खटपट केली होती.

सन १९२५ मध्यें वयाच्या ८८ व्या वर्षीं ते मरण पावले.

## ५. वामन शिवराम आपटे [ १८५८ ते १८९२ ]

हे एक संस्कृत पंडित असून फर्ग्युसन कॉलेजचे पाहिले प्रिन्सिपॉल होते. आपली गाढी विद्वत्ता व तडफदार वागणूक यामुळें ते लोकप्रिय होते. वयाच्या अवघ्या चौतिसाव्या वर्षीं ते मृत्यु पावले.

## ६. महादेव मोरेश्वर कुंटे [ १८३५ ते १८८८ ]

लहानपणींच वडील वारल्यामुळें त्यांचें लहानपण अगदीं हलाखींत गेलें.कोल्हापूर येथें त्यांचे इंग्रजी शिक्षण झालें. ते माधवराव रानडे यांचे जरा पुढें होते.पुढें मोठ्या कष्टानें कांहीं पैसे गोळा करून ते मुंबईस आले. तेथेंच विल्सन हायस्कूलमधून १८५९ सालीं ते मॅट्रिक झाले. १८६४ मध्यें ते बी. ए. झाले. प्रथम कराचीस ते हेडमास्तर होते. पुढें १८६७ मध्यें कोल्हापूरची हेडमास्तरची जागा त्यांनीं पत्करली. सन १८७१ सालीं पुण्याच्या शाळेवर हेडमास्तर म्हणून त्यांची बदली झाली. पुढें एकसारखे ते पुण्यासच होते. ते

एक सव्यसाची लेखक व कवि होते. तसेंच ते प्रचंड वक्तेहि होते. त्यांनीं बराच प्रवासहि केला होता.

सन १८८८ मध्यें ते मृत्यु पावले.

## ७. विष्णु परशुराम पंडित ( १८२७ ते १८७६ )

सातारा जिल्ह्यांतील बावधन या गांवीं पंडितांचा जन्म झाला. त्यांचें संस्कृत अध्ययन लहानपणींच चांगल्यापैकीं झालें होतें. पुढें इंग्रजी भाषेचें महत्त्व जाणून १८४५ त ते पुणें येथें इंग्रजी शिक्षणास आले; पण आकस्मिक रीतीनें वडिलांचा मृत्यु झाल्यामुळें त्यांना इंग्रजी शिक्षण सोडून नोकरी पत्करावी लागली. सन १८४८ त त्यांना४० रु. दरमहाची ट्रान्स्लेशन एक्झिबिशनरची नोकरी मिळाली; पण या नोकरींत त्यांच्या मनाला समाधान वाटेना. सन १८६४ चे सुमारास ते निवृत्त झाले. सार्वजनिक कार्यांत त्यांनीं भाग घेण्यास सुरवात केली. याच वर्षांपासून अखेरपर्यंत ते इन्दुप्रकाशचे संपादक म्हणून काम पहात होते. याच इंदुप्रकाश मधून त्यांच्या जिव्हाळ्याच्या विषयाला त्यांनीं वाचा फोडली. तो विषय म्हणजे ' विधवाविवाह ' ! बालविवाह, पुनर्विवाह, केशवपन, जरठकुमारी-विवाह इत्यादि अनेक विषयांवर त्यांनीं इंदुप्रकाशांत लेख लिहिले. पंडित ईश्वरचंद्रांनीं लिहिलेल्या पुनर्विवाहावरील पुस्तकाचें त्यांनीं भाषांतर केलें होतें. पुढें लोक त्यांनाच 'महाराष्ट्रीय ईश्वरचंद्र ' म्हणून संबोधूं लागले. सन १८६६ मध्यें त्यांनीं ' पुनर्विवाहोत्तेजक ' मंडळीची स्थापना केली. याच संस्थेमार्फत त्यांनीं १८६९ मध्यें घडवून आणलेल्या पुनर्विवाहावरून मोठा वाद झाला होता व याचा परिणाम म्हणून त्यांचेवर बहिष्कार टाकण्यांत आला होता. त्यांनीं प्रायश्चित्त तर घेतलें नाहींच, पण स्वतः १८७४ मध्यें पुनर्विवाह केला. रानड्यांचेवर त्यांची परमभक्ति होती.

रानड्यांनीं पुणें येथें १८७१–७२ मध्यें स्वदेशीची चळवळ सुरू केली त्या वेळीं त्या चळवळीच्या प्रचारार्थ स्वतः गांवोगांव हिंडून त्यांनीं कीर्तनें केलीं.

अशा रीतीनें सार्वजनिक कार्यांत अत्यंत कष्ट केल्यावर सन १८७६ मध्यें महाबळेश्वर येथें ते मृत्यु पावले.

## ८. लोकहितवादी–गोपाळ हरी देशमुख (१८२३–१८९२)

सन १८२३ त पुणें येथेंच त्यांचा जन्म झाला. सन १८४१ मध्यें त्यांनीं इंग्रजी शाळेंत प्रवेश केला व तीन वर्षांत शिक्षण संपवून ते नोकरीस लागले. त्यांना १८४६ त मुनसफीची जागा मिळाली. तें १८५२ मध्यें फर्स्टक्लास मुनसफ झाले. १८६६ मध्यें अहमदाबादेस ते ॲक्टिंग स्मॉलकॉज जज्ज झाले व १८७५ मध्यें नाशिक येथें जॉइंट सेशन जज्ज असतां त्यांनीं पेन्शन घेतली. १८८० मध्यें ते विधिमंडळाचे सभासद झाले व १८८१ मध्यें त्यांना सरकारनें फर्स्टक्लास सरदार केलें.

महाराष्ट्रांतील आद्य सर्वांगीण सुधारक म्हणून त्यांची गणना केली पाहिजे. सन १८४८ पासूनच त्यांनीं स्वदेशीच्या उपदेशास सुरवात केली होती. सन १८४८ ते ५० च्या दरम्यान नुकत्याच निघालेल्या 'प्रभाकर' पत्रांतून त्यांनीं ब्राह्मण्यावर व जातिभेदावर सडकून टीका केली. पुढें १८८२ त त्यांनीं 'लोकहितवादी' नांवाचे मासिक ( पुढें त्रैमासिक ) काढलें होतें. ते १८९२ मध्यें मृत्यु पावले.

## ९. न्यायमूर्ति काशीनाथ त्र्यंबक तेलंग (१८५०–१८९३)

लहानपणापासून अत्यंत हुषार. वयाच्या अवघ्या चौदाव्या वर्षीं मॅट्रिक झाले व सतराव्या वर्षीं बी. ए. झाले. स. १८६९

व ७२ या वर्षीं वकिलीची व ॲडव्होकेटची अशा दोन परीक्षा त्यांनीं दिल्या. वयाच्या अवघ्या बाविसाव्या वर्षीं ते आपल्या अपूर्व बुद्धिसामर्थ्याचे जोरावर ॲडव्होकेट झाले. सन १८८९ मध्यें त्यांना हायकोर्टाच्या जज्जाची जागा मिळाली. वकिलीबरोबरच त्यांनीं सार्वजनिक कार्यांत भाग घेण्यास सुरुवात केली होती. सार्वजनिक कार्यांत रानडे त्यांना आपला सेनापति मानीत इतकी त्यांची कामगिरी मोठी आहे.

ते वयाच्या अवघ्या त्रेचाळिसाव्या वर्षीं वारले.

---